

॥ श्रीविठ्ठल ॥

सार्थ व सटीक

# नारदभक्तिसूत्रें.

आवृत्ति दुसरी



संपादक व प्रकाशक

**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए.,**

**'मुमुक्षु' कर्ते, पुणें.**

किंमत ८ आणे.

सन १९१९.

पुणें, सदाशिव [illegible] पेठ सुधारक प्रिंटिंग ब्युरोंत रामचंद्र विष्णु फडतरे यांनीं छापिलें.

# श्रीनारदप्रार्थना.

## मोरोपंती आर्या.

बा! पापिजनोद्धारीं तुजचि सदा परपहर्ष देवर्षे ! ।
देसी प्रणतांसि जसा मेघ मयूरांसि हर्ष दे वर्षे ॥ ४९ ॥
अघ काय तुजपुढें बा! तें तृणसें, तूं प्रदीप्त पावकसा
देवा! वाल्मीकिगुरो! मज तारायास धांव पाव कसा ॥ ५१ ॥
बा! भवदनुग्रहेंचि ध्रुवबाळ ध्रुवपदासि तो पावे ।
त्वां, तुज 'नमोस्तु' म्हणतां त्यासी पुरुषार्थ सर्व ओपावे ॥ ५२ ॥
बाळ प्रल्हादहि तो अहितोपद्रवशताब्धिला तरला ।
तो त्वत्प्रसाद कीं मति झाली स्मरणीं न विष्णुच्या तरला ॥ ५३ ॥
होतांचि तव अनुग्रह हरिचा होतोचि नारदा साचा ।
प्रभुनें केला आहे बहु मान तुझ्याचि फार दासाचा ॥ ५४ ॥
फिरसि सदा उद्धरिसी प्राणी संसारसंकटीं पडला ।
अडला नुपेक्षिला त्वां, दीनजनोद्धार बहु तुला घडला ॥ ५५ ॥
गातों प्रभुसि यथामति, मजवरि तूं हो प्रसन्न, आइकसी ।
सद्यश वीणारा हो, वीणा राहोचि, कान आई कसी ? ॥ ५६ ॥

महाद्रिशापना.

भगवान्नारद गातो हरिहरयश वाजवूनि वीणारे ।
चित्ता! ज्यातें नमिती सत्कृति रामायणादि वीणारे ॥ २९ ॥

—अवतारमाला.

॥ श्रीविठ्ठलप्रसन्न ॥

( 'मुमुक्षु' पत्रांतून क्रमशः प्रसिद्ध झालेलीं )

सार्थ व सटीक.

# नारदभक्तिसूत्रें.

आवृत्ति दुसरी.



तेथें ज्ञानाविशारद, शारदशशिगौर, गौरवार्ह, कवी, ।
दुस्तरभवाब्धिपारद नारद येउनि सुनीतिला शिकवी ॥
—मोरोपंती भारत, सभा. (१-१२)

संपादक व प्रकाशक.

**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए.,**
'मुमुक्षु' कर्ते, पुणें.

कार्तिकी एकादशी, शके १८४१, आक्टोबर इ. स. १९१९.

किंमत आठ आणे.

# नारदभक्तिसूत्रें.



## विषयानुक्रमाणिका.



---

॥श्रीगोपीप्रियाय नमः॥

# प्रस्तावना.

१. श्रीनारदांच्या भक्तिसूत्रांची एक प्रत मला १० वर्षांपूर्वी उमरावतीस श्रीगुलाबराव महाराजांनीं दिली, व ह्या सूत्रांचें पठण व मनन करण्यास सांगितलें. ही त्यांची अमूल्य देणगी आहे असें मला नंतर सूत्रांच्या संगतीत आढळून आलें. तेव्हांपासून हीं सूत्रें मी आपल्याशींच शतशः गुणगुणत असे. हीं सूत्रें मला फारच प्रिय झालीं. महाराष्ट्र साधूंच्या ग्रंथांत जें भक्तिरहस्य सांपडतें तेंच ह्या सूत्रांत सांपडतें, मात्र ८४ सूत्रांत भक्तिशास्त्राचा सर्वांगांनीं उत्तम विचार केलेला असल्यामुळें जातांयेतां उठतांबसतां मनन करायला हीं फार सोयीचीं व सुखाचीं वाटलीं. ह्या सूत्रांचें मराठींत स्पष्ट विवरण करण्याचीही ५।६ वर्षे इच्छा होती. इतक्यांत येथें एका प्रेमळ सज्जनाच्या तोंडून त्यांचें व्याख्यान ऐकावयास सांपडलें, तेव्हां सूत्रांचें विवरण करावें अशी इच्छा प्रबळ होऊन त्याप्रमाणें 'मुमुक्षू'च्या सातव्या वर्षाच्या अंकांतून मीं त्यांचें क्रमशः विवरण केलें. तें वाचकांस फार पटलें तेव्हां त्यांच्या आज्ञारूप सूचनांवरून थोडा फार फरक करून छापलें व मूळ सूत्रांसह हें विवरण मराठी वाचकांच्या कानीं आज पुस्तकरूपानें पडत आहे.

२. नारदांचीं हीं सूत्रें स्वतंत्रच आहेत. 'आर्तादिभेदाद्वा' ह्या ५६ व्या सूत्रावरून भगवद्गीतेनंतरचीं हीं सूत्रें दिसतात. गीताभागवतांशीं हीं फार संबद्ध आहेत. ६९ व्या सूत्रांतील 'तीर्थीकुर्वन्ति तीर्थाणि' ह्या पदानेः—

भवद्विधा भागवतास्तीर्थभूताः स्वयं विभो ।
तीर्थीकुर्वन्ति तीर्थाणि स्वान्तस्थेन गदाभृता ॥१०॥

ह्या भागवतांतील ( स्कंध १ अ० १३ ) ह्या श्लोकाचें स्मरण होतें. गेल्या आठशें वर्षांतील सर्व भारतीय साधुसंतांच्या विचारांचें व नारदांच्या सूत्रांचें सर्व बाबतींत पूर्ण मिळतें आहे, हें सूत्रांच्या स्पष्टीकरणार्थ मीं गीता, भागवत, ज्ञानेश्वरी, नाथभागवत, दासबोध, तुकोबांचे अभंग, कबीरांचे दोहरे इत्यादिकांतून जीं सरस अवतरणें दिलीं आहेत त्यांवरून स्पष्ट होईल.

३. सदर सूत्रांत गोपींच्या कृष्णभक्तीबद्दल जो अलोट प्रेमा दिसतो त्यावरून हीं सूत्रें वल्लभसांप्रदायी आहेत असें कोणी म्हणतात. पण गोपींची कृष्णभक्ति वल्लभांनाच मान्य आहे आणि इतरांना नाहीं असें नसून सर्व साधुसंतांनीं गोपीप्रेमाचें कौतुकच केलें आहे हें त्या सूत्रांवरील विवरण वाचून समजेल. शिवाय वाल्लभांशीं किंवा दुसऱ्या कोणाही सांप्रदायिकांशीं 'अद्वैतभक्तीचें' कोडकौतुक करणाऱ्या महाराष्ट्रीयांचा तरी विरोध नाहीं. गीता-भागवत ग्रथित करणाऱ्या व्यासमुनींच्या व श्रीकृष्णाच्या संगतींतले कृष्णसखे नारद यांनींच हीं सूत्रें गुंफिलीं आहेत असा माझा विश्वास आहे. शिवाय सूत्रांतील प्रेमानंद भोगणाऱ्या प्रेमळांला हे बाहेरचे विचार फारसे महत्वाचे नाहींत; सूत्रें कोणीही केव्हांही गुंफो, त्यांतील भक्तिप्रेमानंद दिव्य आहे त्याचाच ते हंस अनुभव घेतील यांत संशय नाहीं.

४. हीं सूत्रें रोज एकदां तरी पाठ म्हणावींत. ह्या ८४ सूत्रांचें अर्थानुरोधानें वर्गीकरण करून तें अनुक्रमणिकेंत मीं दिलेलें आहे, त्यावरून सर्वांगांनीं भक्तिशास्त्राचा यांत कसा पूर्ण विचार केला आहे तें समजेल. येथें फक्त ११२ मुद्यांचाच विचार करितों. ८३ व्या सूत्रांत नारदांनीं आपल्या प्राक्कालीन किंवा समकालीन भक्त्याचार्यांचा उल्लेख केला आहे, त्यांत श्रीविष्णूचे उपासक सनत्कुमार, व्यास, शुक, बलि, इत्यादि, रामाचे उपासक हनुमान व बिभीषण, कृष्णाचे उपासक उद्धव या सगुणोपासकांनाच नारदांनीं गोवलें आहे; २१ व्या सूत्रात भक्तिलक्षण देऊन 'यथा व्रजगोपिकानाम्' म्हणून गोपींचेंच उदाहरण दिलें आहे; ८२ व्या सूत्रांत गुणमाहात्म्य, रूप, वात्सल्य, दास्य, सख्य, इत्यादि भक्तीचे ११ प्रकार सांगितले आहेत; ८० व्या सूत्रांत 'सर्वदा सर्वभावेन भगवानेव भजनीयः स कीर्त्यमानः शीघ्रमेवाविर्भवति' ह्याप्रमाणें देवाला एकनिष्ठपणानें भजा म्हणजे तो प्रत्यक्ष प्रकट होऊन कृपा करील असें आश्वासन भक्तांना दिलें आहे; ह्या सर्व गोष्टींवरून नारदांना सगुणोपासनाच अभिप्रेत होती हें सिद्ध होतें. तथापि नारदांचा—किंवा अन्य सगुणोपासकांचा—निर्गुणाशीं विरोध नाहीं. हें त्यांनीं शांडिल्यांनाही भक्त्याचार्यांच्या मालिकेंत गोवून १८ व्या सूत्रांत त्यांच्याही मताचा अनुवाद केला आहे त्यावरून स्पष्ट होतें. 'सगुणनिर्गुण एक गोंविंद रे' हाच सिद्धांत आहे तरी प्रेमळ भक्तांना--ज्ञानी भक्तांना—पराभक्तीचें

सुख भोगणारांना—सगुण साकाराचेंच प्रेमसुख निरंतर घोटावेंसें वाटतें. सर्व संतांप्रमाणें नारदांचेंही हेंच धोरण आहे.

५. भक्तीचा कर्माशीं व ज्ञानाशीं विरोध नाहीं पण कर्माचरण व ज्ञान भक्तयनुकूल पाहिजे असा त्यांचा कटाक्ष आहे. भक्तिपंथ अर्वाचीन आहे असें कित्येक म्हणतात, पण तें बरोबर नाहीं. ऋग्वेदांतील देवतांच्या प्रार्थना भक्तिप्रधान आहेत. अद्वैतमार्तंड श्रीशंकराचार्य यांचीं देवतास्तवनपर स्तोत्रें प्रसिद्ध आहेत. गीता व भागवत हे भक्तिमार्गाचे आधारस्तंभच आहेत. 'मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते,' 'मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु,' 'न मे भक्तः प्रणश्यति,' 'मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते,' 'मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः,' 'सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरण व्रज,' इत्यादि वचनें साक्षात् भगवताच्याच मुखांतलीं आहेत. भक्तिपंथ अनादिच आहे. देवानें मनुष्याला हृदय दिलें तेव्हांपासून हृदयसंपुटीं राहून सर्व प्रेरणा करणाऱ्या भगवंताचें प्रेमही दिलें आहे. 'शरण विठोबासी जावें। निजनिष्ठा नाम गावें।' हेंच वेदवाणीचें तरी तात्पर्य आहे व हेंच नारदांनीं ह्या सूत्रांत सांगितलें आहे.

विष्णवे जिष्णवे शंखिने चक्रिणे रुक्मिणीरागिणे जानकीजानये।
बल्लवीवल्लभायार्चितायात्मने कंसविध्वंसिने वंशिने ते नमः ॥१॥

पुणें 'मुमुक्षु' कचेरी, आषाढी एकादशी, शके १८३६.

साधुसंताचा दासानुदास,
**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.**

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

पहिली आवृत्ति पांच वर्षांत खलास झाली. ती प्रसिद्ध होतांच पुष्कळांनीं तिची तारीफ केली. श्रीगुलाबराव महाराजांच्या पत्रांतील उतारा व इतर दोन अभिप्राय पुढें दिले आहेत. भाविकांना ह्या सार्थ व सटीक भक्तिसूत्रांच्या अवलोकनानें भक्तिप्रेमानंद मिळाला व जनांच्या चित्तवृत्ति भक्तिमार्गाला लागल्या कीं उत्तम अभिप्राय मिळाला असें मी समजतों!

पुणें मुमुक्षु कचेरी
कार्तिकी एकादशी शके १८४१

**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.**

# कांहीं निवडक अभिप्राय.

**श्रीगुलाबराव महाराज म्हणतात**—" आपलीं सार्थ व सटीक सूत्रे मीं समग्र वाचलीं. सूत्रांचें विवरण चांगलें झालें आहे. स्पष्टीकरणार्थ श्रुतिसंतवचनांचा जो संग्रह केला आहे तो तर सोन्यावर जडावाप्रमाणें नुस्थळीं व समयोचित आहे. आपला प्रेमळपणा ठिकठिकाणीं दृग्गोचर होतो. गुजराथी व हिंदुस्थानी भाषांतून या सूत्रांवर पूर्वीं ज्या टीका झाल्या होत्या त्यांत शांकरमताशीं अंशतः तरी विरोध होतो, परंतु ह्या पुस्तकांत तो दोष मुळींच नसल्यामुळें त्या सगळ्यांहून हें चांगलें अतएव संग्राह्य आहे."

**विविधज्ञानविस्तार** [ सप्टेंबर १९१४ ]—"हीं सूत्रें मूळांतच उत्तम आहेत, त्याच्यांत रा. लक्ष्मणरावांनीं आपल्या गोड विवरणानें भर घातली आहे. रा. लक्ष्मणरावांची मराठी भाषा महाराष्ट्रसंतांच्या अमृतवाणीच्या ओलाव्यांत कशी थबथबलेली असते हें या पुस्तकाच्या वाचनानें नीट ध्यानांत येईल. स्पष्टीकरण फार विशद केलें आहे. प्रत्येक भागवतानें या पुस्तकाचा अवश्य संग्रह करून त्याचें नीट मनन करावें."

**धर्मजागृति** [ आक्टोबर १९१४ ]—" देवर्षि नारदांच्या भक्तिशास्त्रावरील ८४ संस्कृत सूत्रांचें मराठींत विवरण करण्यास रा. पांगारकरांसारखा सहृदय व्याख्यानकार लाधल्याबद्दल महाराष्ट्राचें अभिनंदन करणें जरूर आहे. स्पष्टीकरण सरस आहे. भक्तिप्रवण स्त्रीपुरुषांनीं त्याचा अवश्य संग्रह करावा."

# श्रीनारदांचें चरित्र.



**अहो देवर्षिर्धन्योऽयं यत्कीर्तिं शार्ङ्गधन्वनः ।**
**गायन्माद्यन्निदं तन्त्र्या रमयत्यातुरं जगत् ॥**

—श्रीमद्भागवत ( स्कंध ११-६-३९ ).

१. "अहो ! हे देवर्षि नारद परमधन्य होत. कारण हे स्वतः आनंदित होऊन ( माद्यन् ) त्या हातीं शार्ङ्गधनुष्य धारण करणाऱ्या परमेश्वराचें यश वीणेनें ( तन्त्र्या ) गाऊन ह्या दुःखी ( आतुर ) जगाला रमवितात !"

२. आपणांस 'नारदभक्तिसूत्रां'च्या विवरणांत व मननांत आतां आनंद भोगावयाचा आहे, तत्पूर्वी हा एवढा भक्तीचा आनंद ज्या नारदमुनींच्या कृपेनें आपणास मिळाला त्यांच्या चरित्राचा थोडासा विचार करूं. संत-चरित्रे तारक व परमपवित्र असतात म्हणून संतचरित्रांचें गायन हे मंगलां-तलें मंगल होय.

३. भारतवर्षीय प्राचीनकोशांत नारद एकंदर सात होऊन गेले असें महाभारतादि ग्रंथांच्या आधारानें दाखविलें आहे ! पर्वतऋषीचा मामा हा एक नारद, वसिष्ठपत्नी अरुंधति इचा भाऊ व सत्यवती नामक स्त्रीचा पति हा दुसरा नारद, इकडल्या गोष्टी तिकडे व तिकडल्या इकडे सांगून कलह लावणारा एक गंधर्व हा तिसरा नारद, कुबेरसभेंत राहणारा चवथा नारद, जन्मेजयाच्या सर्पसत्रांतला एक सदस्य विश्वामित्र हा पांचवा नारद, श्रीरामाच्या दरबारांतल्या अष्ट धर्मशास्त्र्यांपैकीं एक हा सहावा नारद—ह्या सहाही नारदांशीं आपणांस येथें कांहीं एक करावयाचें नाहीं. आपले नारद ह्यांहून वेगळे आहेत. स्वायंभुव मन्वंतरांत ब्रह्मदेवांनीं जे दश मानसपुत्र निर्माण केले त्यांपैकीं दहावा पुत्र जो नारद तोच 'भक्तिसूत्रांचा कर्ता' होय. भक्तिसूत्रांत ३० वें सूत्र 'स्वयं फलरूपतेति ब्रह्मकुमारः' असें स्पष्ट म्हटलें आहे, त्यावरून भक्तिसूत्रकार नारद म्हणजे ब्रह्मदेवाचे मानस-पुत्रच होत असें सिद्ध होतें. नारदस्मृति, नारदपुराण, नारदपांचरात्र इत्यादि ग्रंथांचे कर्ते कोणते नारद व ते एकच नारद होते कां अनेक होते हें माहीत नाही. जनांना कीर्तनभक्ति शिकविणारे, हातीं वीणा घेऊन भगवंतांचें

नामसंकीर्तन करीत त्रैलोक्यांत संचार करणारे, वाल्मीकि, शुक, व्यास, प्रल्हाद, ध्रुव इत्यादिकांना भगवताचे गुणानुवाद गायला लावणारे, निरिच्छ, निस्पृह, निष्परिग्रह, सर्व संतांना परमवद्य असलेले जे देवर्षि नारद त्यांचींच नारदभक्तिसूत्रें आहेत यांत शंका नाहीं. हे पूर्वकल्पांत दासीपुत्र असून तदुत्तरकल्पांत ब्रह्मकुमार झाले.

४. नारदांचे उभयकल्पांतलें चरित्र फारच मनोरम आहे. ते त्यांनींच स्वतः व्यासांना सांगितलेलें भागवताच्या प्रथम स्कंधांत अ० ५।६ मध्यें दिलेलें आहे व्यासांना भागवत ग्रंथाची स्फूर्ति नारदांनींच दिली. तो प्रसंग असा:-

एकदां सरस्वती नदीच्या तीरावर व्यास हे एकटे बसले असतांना स्वतः च्या चित्ताची अप्रसन्नता त्यांची त्यांनाच कळून आली. ते स्वतःशींच म्हणाले:-" मी बाळपणापासून उत्तम आचरणानें राहिलों; व वेद, गुरु व अग्नि यांची निष्कपटपणानें सेवा केली, त्यांच्या आज्ञा पाळल्या, स्त्रीशूद्रादिकांनाही वेदार्थ उत्तम कळावा म्हणून महाभारतग्रंथ लिहिला आणि असें असूनही ब्रह्मतेजानें युक्त अशा सत्पुरुषांत श्रेष्ठ असा हा माझा जीवात्मा प्रसन्न कां होत नाहीं ? " ह्याप्रमाणे आपण कृतकृत्य झालों नाहीं असें वाटून व्यास खिन्नता पावले होते तोंच अकस्मात् त्या विप्रर्षीला भेटण्याकरितां वीणापाणि देवर्षि नारद प्राप्त झाले. व्यासांनीं नारदांची यथोचित पूजा केली व त्यांना आपलें मनोगत सांगितलें. व्यास म्हणाले:—

त्वं पर्यटन्नर्क इव त्रिलोकीमंतश्चरो वायुरिवाऽऽत्मसाक्षी ।
परावरे ब्रह्मणि धर्मतोव्रतैः स्नातस्य मे न्यूनमलं विचक्ष्व ॥ ७ ॥

अर्थः—" नारदा ! तुम्ही सूर्याप्रमाणें नेहमीं त्रैलोक्यांत पर्यटन करीत असतां म्हणून तुम्हांला सर्व गोष्टी प्रत्यक्ष दिसतात. वायूप्रमाणें तुम्ही सर्वांच्या अंतर्यामीं संचार करितां. परब्रह्मध्यानांत व वेदांत मी निष्णात आहें व योगाभ्यासानें मी निष्पाप झालों आहें असें असून माझी तळमळ न जाण्यासारखें माझ्यांत न्यून काय आहे तें मला सांगा." ह्या व्यासांच्या प्रश्नाला नारदांनीं उत्तर दिलें:—

भवताऽनुदितप्रायं यशो भगवतोऽमलम् ।
येनैवासौ न तुष्यत मन्ये तद्दर्शनं खिलम् ॥ ८ ॥

अर्थः—" व्यासा ! तुमच्या ज्ञानांत मला एक न्यून दिसत आहे व

त्यामुळेंच तुमच्यावर परमात्मा प्रसन्न होत नाहीं व तुमची तळमळ जात नाहीं. तें न्यून हेंच कीं, तुम्ही पुष्कळ ज्ञान मिळविलें व ग्रंथ लिहिले, पण भगवंताच्या निर्मल यशाचें वर्णन केलें नाहीं." म्हणून आतां असें करा:-

## आर्या.

वाखाणावें प्रेमें भगवद्यश मुनिवरा तुवां आतां ।
चित्त प्रसन्न होतें प्रभुचा महिमाचि आदरें गातां ॥ ७ ॥

--मोरोपंती मंत्रभागवत.

नारद म्हणतात, "पूर्वीच्या जाणत्या लोकांनीं असें सांगून ठेविलें आहे कीं, मनुष्यानें पुष्कळ तप केलें, शास्त्राध्ययन केलें, यज्ञयाग केले, दान केलें पण त्या सर्वांचे खरें शाश्वतचें फळ म्हणजे उत्तमश्लोक जो परमात्मा त्याचे गुणानुवाद करणें हेंच होय. भगवद्भजनाची एकदां का गोडी लागली कीं मग ते कांहींकेल्या सुटत नाहीं. याला माझें स्वतःचेंच उदाहरण पहा." असें म्हणून नारदांनीं व्यासांना सत्संगतींत आपल्याला भगवद्गुणानुवादाची गोडी कशी लागली तें सांगितलें. हें नारदांचें आत्मचरित्र फारच मनोहर आहे. नारदांच्या उपदेशावरून व्यासांनीं भागवतग्रंथ रचून तो शुकाला सांगितला व शुकांनीं तो परीक्षितीला सांगितला. असो. नारदांच्या आत्मचरित्राकडे आपण आतां वळूं.

५. मागच्या कल्पांतील पूर्व जन्मात वेदज्ञ ऋषींच्या एका दासीच्या पोटीं नारदांचा जन्म झाला. ते ऋषी पावसाळ्यांत मात्र एके ठिकाणीं राहत असत. त्या ऋषींच्या सेवेकडे नारदांच्या आईनें त्यांची त्या बालवयांत योजना केली होती. ऋषींच्या शुश्रूषेंत असतांना मी कसा राहिलों व त्यांची कृपा कशी झाली हे नारद ( स्कंध १–५ ) स्वमुखानें सांगतातः–

ते मय्यपेताखिलचापलेऽर्भके । दान्तेऽधृतक्रीडनकेऽनुवर्तिनि ।
चक्रुः कृपा यद्यपि तुल्यदर्शनाः । शुश्रूषमाणे मुनयोऽल्पभाषिणि ॥२४॥
उच्छिष्टलेपाननुमोदितो द्विजैः । सकृत्स्म भुंजे तदपास्तकिल्बिषः ।
एवं प्रवृत्तस्य विशुद्धचेतस–। स्तद्धर्म एवाऽऽत्मरुचिः प्रजायते ॥ २५ ॥

**अर्थः**—" ते ऋषि तुल्यदर्शन होते म्हणजे प्रियाप्रियभाव त्यांच्या ठिकाणीं नव्हता. तथापि ते माझी राहणी पाहून मजवर प्रसन्न झाले, त्यांनीं मजवर कृपा केली. मी कसा वागलों तें सांगतों. माझ्याठिकाणीं मुलांना सहज

असा जो चंचलपणा तो नव्हता, मी दान्त म्ह० शांतस्वभावाचा होतो, माझीं इंद्रियें स्वाधीन होतीं, क्रीडनक म्ह० खेळणीं व बाळलेणीं मला आवडत नसत, त्यांना अनुकूल अशाच तऱ्हेनें त्यांच्या मनधरणीनें मी वागे, पडेल तें काम करून त्यांची मनोभावें सेवा करीं, कामापुरतें थोडकेंच बोलें, त्या ब्राम्हणांच्या पानांतील उच्छिष्ट अन्न ते सांगतील व देतील तेव्हांच एकदां मी खात असें, तेणें करून (त्या पवित्र अन्नाच्या सेवनानें) माझीं सकल पातकें नष्ट झालीं व अशा प्रकारें क्रम चालला असतां माझी चित्तशुद्धि झाली व त्या महात्म्यांच्या धर्माविषयीं मला आवड उत्पन्न झाली."

भगवंतांनीं गीतेंत ज्ञानार्जनाचा उपाय सांगतांना 'तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया' असें म्हटलें आहे, पण ती संतसेवा कशी करावी हें नारदांच्या ह्या वर्तनावरून समजतें. वृत्तींत हूडपणा नाहीं, खेळाकडे लक्ष नाहीं, संतगुरूंना अनुकूल असें वागावें, त्यांच्याच सेवेंत रमावें, त्यांच्याशीं मर्यादेनें वागावें, अल्पभाषी असावें, ते जेवून उरेल तें उच्छिष्ट महाप्रसाद म्हणून भक्षण करावा, क्षुधातृषानिद्रादिकांना जिंकून कह्यांत ठेवावें असा नारदांचा क्रम चालला होता. संतसेवा ती हीच. संतांना उपदेश विचारायला नको आहे. त्यांच्या सेवेंत राहून त्यांच्या ज्या स्वैरकथा चालतात त्या सहजासहजीं कानावर पडून न कळत भगवत्प्रेम चित्तांत दाटूं लागतें. त्या मुनींच्या आश्रमांत भगवंतांच्या ज्या प्रेमकथा चालत त्या मुकाट्यानें ऐकतां ऐकतां नारदांना भगवंताचें प्रेम जडलें.

तत्रान्वहं कृष्णकथाः प्रगायतामनुग्रहेणाशृणवं मनोहराः ।
ताः श्रद्धया मेऽनुपदं विशृण्वतः प्रियश्रवस्यंग ममाभवद्रुचिः ॥ २ ॥

त्या मुनींच्या तोंडच्या त्या मनोहर कृष्णकथा ऐकतां ऐकतां प्रियश्रवसि (प्रिय आहे कीर्ति ज्याची अशा) भगवंताच्या ठिकाणीं माझी प्रीति जडली असें नारद म्हणतात. नारदांना संतसंगाचा हा जो अनुभव आला तो त्यांच्या सूत्रांत कसा ग्रथित झाला आहे हें त्यांच्या ६७-७३पर्यंत सूत्रांतील रसभरित संतवर्णनावरून व भक्तीचीं साधनें (३४-४२) सांगतांना अखेरचें जें साधन त्यांनीं 'मुख्यतस्तु महत्कृपयैव' याप्रमाणें सांगितलें आहे त्यावरून सहज कळणारें आहे. असो. भगवंताच्या ठिकाणीं प्रेम जडलें असतांना त्यांची बुद्धि निश्चल झाली व त्या बुद्धीच्यायोगानेंच स्थूल व सूक्ष्म शरीरें मी नसून

परब्रह्मस्वरूपी आहे असें त्यांस ज्ञान झालें. त्या ऋषींनींही नारदांचा अधिकार जाणून त्यांना जाण्याच्या पूर्वीं गुह्य ज्ञानाचा उपदेश केला.

६. नारदांना भक्तिज्ञानाचा उपदेश करणारे ते ऋषी दुरदेशीं गेले, तेव्हां नारद फार लहान होते. पुढें त्यांच्या प्रेमळ मातेचे सर्पदंशानें देहावसान झालें, नारदांना वस्तुतः फार दुःख व्हावयाचें, पण सत्संगांत जो भक्तिसुखाचा जिव्हाळा त्यांना प्राप्त झाला होता, त्यामुळें त्यांचें चित्त स्थिर राहिलें:—

तदा तदहमीशस्य भक्तानां शममीप्सतः ।
अनुग्रहं मन्यमानः प्रातिष्ठं दिशमुत्तराम् ॥१–६–१०॥

नारद म्हणतात कीं, "भक्ताचें कल्याण इच्छिणाऱ्या त्या भक्तवत्सल परमात्म्याचा हा अनुग्रहच आहे" असें मानून मी उत्तरदिशेकडे चालता झालों. यानंतर अनेक देश, नगरें, खेडींपाडीं, पर्वत व रानें उल्लंघीत नारद एका घोर अरण्यांत गेले. तेथें एका नदीच्या जलांत स्नान करून व पाणी पिऊन ते एका पिप्पलवृक्षाच्या तळीं बसून ऋषींनीं सांगितल्याप्रमाणें भगवच्चिंतन करूं लागले. भावानें भगवच्चरणांचें ध्यान करीत असतां भगवंताच्या दर्शनाच्या उत्कंठेनें त्यांच्या नेत्रांतून अश्रुधारा चालल्या तों भगवान हळुहळू त्यांच्या हृदयांत प्रकट झाले. दर्शन होतांच प्रेमभरानें त्यांचें सर्व शरीर रोमांचित झालें. आनंदलहरींनीं त्यांचें अंतःकरण दाटून गेलें व त्यांचें द्वैतभान हरपलें. एकवारच तें स्वरूप हृदयांत दिसलें व पुन्हां दिसेनासें झालें. त्यामुळें नारदास वेड्यासारखें झालें. तें मनोहर रूप अखंड डोळ्यांसमोर असावें अशी उत्कंठा झाली, तें दिसेना म्हणून वृत्ति बावरली, दुसरें कांहीं नकोसें झालें. पुन्हां नारद एकाग्र अंतःकरण करून ध्यान करूं लागले; पण 'तें' दिसेना! चित्त परमावधीचें आतुर झालें. ह्याप्रमाणें त्या निर्जन अरण्यामध्यें भगवद्दर्शनाचा नारदांचा सतत प्रयत्न चालला असतां भगवंतांनीं नारदांची तळमळ दूर करण्याकरितां गंभीर व मधुर वाणीनें सांगितलें, "वत्सा नारदा! ह्या जन्मांत माझें तुला दर्शन होणार नाहीं. ज्यांच्या चित्तावरचे पापसंस्कार संपूर्ण नष्ट झाले नाहींत त्यांना माझें दर्शन दुर्लभ आहे. तुला थोडा सत्संग घडल्यामुळें माझ्याठिकाणीं तुझी प्रीति जडली आहे. तूं ह्या निंद्य शरीराचा त्याग केल्यावर पुढील जन्मीं माझा पार्षद होशील. तुझें प्रेम एकवार माझ्या ठिकाणीं दृढ जडलें आहे तें कधीं

कमी होणार नाहीं. माझें तुला अखंड स्मरण राहील " ही परमेश्वराची आकाशवाणी ऐकून नारदांनीं भक्तिभावानें वंदन केलें. ह्यानंतर भगवंतांच्या उपकारांचें स्मरण करीत व त्यांच्या गुह्य नामांचें पठण करीत संतुष्ट व निस्पृह होऊन पृथ्वीवर हिंडत हिंडत कालाची वाट पहात त्यांनीं कित्येक वर्षे काढलीं. अखेर तो पांचभौतिक देह पडला.

७ त्या कल्पाच्या समाप्तिकालीं सागरांत श्रीनारायण योगनिद्रा घेत होते. तेव्हां ब्रह्मदेवाच्या श्वासाबरोबर त्याच्या उदरांत नारदांनीं प्रवेश केला. सहस्र युगांनंतर ब्रह्मदेव जागे होऊन पुन्हां सृष्टि उत्पन्न करण्याची इच्छा करीत असतांना त्यांच्या इंद्रियांपासून मरीचिप्रभृति ऋषि व नारद उत्पन्न झाले. महाविष्णूंच्या कृपाप्रसादानें नारद कृतार्थ होऊन अकुंठितगति झाले. आतांचें आपलें चरित्र ते सांगतातः—

देवदत्तामिमां वीणां स्वरब्रह्मविभूपिताम् ।
मूर्च्छयित्वा हरिकथां गायमानश्चराम्यहम् ॥ १-६-३३. ॥

**अर्थ**—" देवानें दिलेली व नादब्रह्माच्यायोगानें अत्यंत शोभणारी ही वीणा वाजवीत परमेश्वराच्या कथांचें गायन करीत आतां मी त्रैलोक्यांत पर्यटन करीत असतों." देवाचीं चरित्रें गात हिंडत असतांना नारद अधिकारी जीव पाहून त्यांवर कृपा करितात हें ध्रुवादिकांच्या चरित्रावरून जगविश्रुत आहे. भगवान् आतां त्यांना हवे तेव्हां दर्शन देतात. ' आहूय इव मे शीघ्रं दर्शनं याति चेतसि ' ( १-६ ३-४ ) हरिसेवा हें सर्व साधनांतलें उत्तमोत्तम साधन आहे, असा त्यांचा उपदेश आहे. ' सर्वदा सर्वभावेन निश्चिंतितैर्भगवानेव भजनीयः' (सूत्र ७९) हेंच त्याच्या भक्तिसूत्रांचेंही सार आहे.

८. नारदांचें गमन त्रिलोकीं आहे. व्यास, वाल्मीकि, प्रल्हाद, ध्रुव इत्यादि अनेक महर्षी व सद्भक्त नारदांच्या अनुग्रहानें कृतकृत्य झालेले आहेत. अनेक पुराणांतून व इतर ग्रंथांतून 'परानुग्रहवांछया पर्यटन् सकलान् लोकान् ' असें त्यांचें वर्णन आहे. वाल्मीकिरामायणाचा पहिलाच श्लोकः—

तपः स्वाध्यायनिरतं तपस्वी वाग्विदां वरम् ।
नारदं परिपप्रच्छ वाल्मीकिर्मुनिपुंगवम् ॥ १ ॥

अशा नारदांचें भक्तिशास्त्रावरचें अनुपम व्याख्यान आतां आपण ऐकूं.

॥ श्रीगोपालकृष्णाय नमः ॥

# नारदभक्तिसूत्रें.

## १ भक्तीची व्याख्या.

अथातो भक्तिं व्याख्यास्यामः ॥ १ ॥

सा त्वऽस्मिन् परमप्रेमरूपा ॥ २ ॥

अमृतस्वरूपा च ॥ ३ ॥

यल्लब्ध्वा पुमान् सिद्धो भवत्यमृतो भवति तृप्तो भवति ॥४॥

यत्प्राप्य न किंचिद्वांछति न शोचति न द्वेष्टि न रमते नोत्साही भवति ॥ ५ ॥

यज्ज्ञात्वा मत्तो भवति स्तब्धो भवति आत्मारामो भवति ॥ ॥ ६ ॥

### अर्थ.

आतां आम्ही भक्तीचें व्याख्यान करितों. भक्ति ही ह्या परमात्म्याविषयीं परमप्रेमरूपा आहे, आणि अमृत-( मोक्ष )-रूपा आहे. ती प्राप्त झाली असतां पुरुष सिद्ध म्ह. कृतकृत्य होतो, अमर होतो, तृप्त होतो, ती पावून मग तो दुसऱ्या कशाचीही इच्छा करीत नाहीं किंवा शोक करीत नाहीं, कोणाचाही द्वेष करीत नाहीं, ऐहिक विषयांच्या ठिकाणीं रमत नाहीं, व कसलाही हव्यास धरीत नाहीं. भक्तीचा आनंद भोगून तो उन्मत्त होतो, स्तब्ध म्हणजे निष्क्रिय होतो व आपला आपल्याच ठिकाणीं रंगून जातो.

## स्पष्टीकरण.

( १–३ ) भक्तीचें व्याख्यान करावयास भागवतशिरोमणि नारद प्रवृत्त होतात. " श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् । अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ " ह्याप्रमाणें नऊ प्रकारची भक्ति भागवतांत सांगितली आहे व नारदांनीं स्वतः ८२ व्या सूत्रांत अकरा प्रकारानें ती करतां येते असें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें भक्ति सगुणाची करतां येते व निर्गुणाचीहि करतां येते. आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी असे भक्तांचे चार प्रकार पुढें ५६ व्या सूत्रांत सांगितले असल्यामुळें भक्तिही चार प्रकारानें सांगतां येते. तसेंच गुणभेदावरून सात्विक, राजस व तामस असेही भक्तीचे तीन प्रकार सांगतां येतात. ह्याप्रमाणें दोन, तीन, चार, नऊ, अकरा किंवा आणखीही भक्तीचे कांहीं प्रकार सांगतां येतील; पण नारद पुढें भक्तीची जी व्याख्या करितात ती ह्यांपैकीं अमक्या एका प्रकारांतली आहे असें नसून सर्व प्रकारांना व्यापून राहणारी शुद्ध **प्रेमरूप** अशी आहे. " ये न्हवी तिजी ना चौथी । हे पाहिली ना सरती । पैं माझिये सहज स्थिती । भक्ति नाम ॥ ११३ ॥ (ज्ञानेश्वरी अ० १८)" श्रीहरि जसा सहज आहे तसें त्याशीं सहजप्रमानें मिसळून जाऊन तन्मय होणें ही भक्ति होय. प्रेम हें पराभक्तीचें स्वरूप आहे. तें प्रेमही परमप्रेम पाहिजे. कांहीं प्रेम शरीरावर, कांहीं बायकोवर, कांहीं पोरांवर, कांहीं लौकिकावर आणि कांहीं देवावर असें दहाठायीं वांटून गेलेलें प्रेम कांहीं परमप्रेम नव्हे. 'मनेसहित वाचा काया। अवघें दिलें पंढरिराया ॥' असें प्रेम पाहिजे. हेंच **परमप्रेम** होय. ' धन्य म्हणे तुका जन्मा तींच आलीं । हरिरंगीं रंगलीं सर्वभावें ॥ १ ॥' असें सर्वभावानें हरिरंगांत रंगून जाणें व आपणासकट विश्व हरिमय अनुभवणें हें परमप्रेम होय. भक्ति ही **'अस्मिन्'** परमप्रेमरूपा आहे. येथें 'अस्मिन्' म्हटलें आहे 'तस्मिन्' म्हटलें नाहीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे. परमात्मा ' तो ' नव्हे तर ( हृदयावर हात ठेवून सांगतात कीं) 'हा!' तो म्हणजे दूरचा व वेगळा असा अर्थ होईल. समर्थ म्हणतात त्याप्रमाणें 'देव जवळी अंतरीं' आहे. पिंगलेला खरें वैराग्य उत्पन्न झालें तेव्हां 'संतं समीपे रमणं रतिप्रदं' असा श्रीहरि तिला जवळी अंतरींच

आढळला. देव 'इदंते'नें न पाहतां 'अहंते'नें पहावयाचा आहे. 'सर्वतः पाणिपादं तत् सर्वतोऽक्षिशिरोमुखं । सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति' असा विश्वात्मा विश्वरूप श्रीहरि हा दूर आणि वेगळा नसून 'जवळी-अंतरीं' आहे. त्याच्याठिकाणीं निरतिशय प्रेम ठेवून त्या प्रेमरंगांत आपलेपणही विसरून जाणें ही खरी भक्ति आहे. हें प्रेम वास्तविक व्याख्येनें कळणारें नाहीं. तें अनुभवावयाचें आहे, बोलावयाचें नाहीं. 'प्रेम नये बोलतां सांगतां दावितां। अनुभव चित्ता चित्त जाणे ॥' नारदांनींही पुढें ५१-५२ सूत्रांत 'अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपं। मूकास्वादनवत्' असेंच म्हटलें आहे. भक्तिप्रेमाचें खरें लक्षण देण्यासारखें नसूनही लोकोपकारार्थ नारदांनीं त्यावर सूत्रें लिहिण्याचें काम अंगावर घेतलें यांत त्यांचा कारुणिकपणाच दिसतो. प्रेमाचें सुख अनिर्वचनीयच आहे. 'तें सुख काय सांगों वाचे बोलतां नये' हेंच खरें आहे. हें प्रेम त्रिपुटींतलें नाहीं. 'मेळवितां अंगें अंग प्रेमें रंग वाढतो ॥' असें तें प्रेम आपलें वेगळेपण निःशेष विसरून भोगावयाचें आहे. प्रेमावांचून पूजा, पोथी पुराण, भजनकीर्तनही फुकट आहे. "प्रेमवीण श्रुतिस्मृतिज्ञान। प्रेमेंवीण ध्यान-पूजन। प्रेमेंवीण श्रवणकीर्तन। वृथा जाण नृपनाथा।" ३३२. (एकनाथी भागवत अ० २) देवही प्रेमाचाच भोक्ता आहे. 'अंतरीची घेतो गोडी। पाहे जोडी भावाची ॥' असा श्रीहरि प्रेमळ आहे व तें परमप्रेम ज्यांच्या चित्तांत आहे त्यांच्या ठिकाणींही त्याला शोधावें. देवाचें शुद्धस्वरूप प्रेम हेंच आहे व भक्ताचें पूर्णपणही प्रेमांत आहे, तेव्हां देवभक्तांचा खरा एकांत प्रेमांत होतो. हीच भक्तीची व्याख्या आहे. भक्ति ही **अमृतस्वरूपा** आहे. 'मरतिये आकारीं अमर जे वस्तु' त्या परमात्मपदार्शीं तन्मय झालेला भक्तही अमरच होतो. त्याच्या प्रेमाचा प्रवाह अखंड चालतो. त्याला चढ-उतार नसतो. 'अंगीं प्रेमाचें भरतें नेघे उतार चढ तें।' असें त्याचें प्रेम अखंड असल्यामुळें तो सहजच अमरपदावर आरूढ होतो. 'अमर तूं खरा। नव्हे कैसा मी दातारा।' असे तुकोबांसारखे तन्मय झालेले भक्त देवाशीं प्रेमाच्या लडिवाळपणानें भांडावयाला तयार होतात ते याच जोरावर. भक्ति प्रेमरूपी व अमृतरूपी असल्यामुळें प्रेमामृत पिऊन तृप्त झालेल्या भक्तांच्या

सर्व वृत्ति हरिचरणीं हरिमय होऊन स्थिरावतात. “ प्रेमाच्या अमृतें रसना ओलावली । मनाची राहिली वृत्ति पायीं ॥” अशी ही परमप्रेमाची जात आहे.

( ४ ) हें प्रेमामृतरूप भक्तीचें वर्म ज्याच्या हातीं आलें त्याचें वर्णन ४।५।६ या सूत्रांत केलें आहे. तो **सिद्ध** होतो. सिद्ध म्हणजे सिद्धि संपादन केलेला असा अर्थ नव्हे तर सिद्ध म्हणजे कृतकृत्य. त्याचीं सर्व साधनें संपतात, सफल होतात, त्याचें परमार्थाचें कोडें उलगडतें, त्याचा हिशेब सुटतो, त्याची संशयनिवृत्ति होऊन तो निःसंदेह होतो. त्याला कळावयाचें तें कळलेलें असतें, समजावयाचें तें समजलेलें असतें. त्याला अणिमादि योगसिद्धींची पर्वा नसते. भक्ति हेंच परमसाधन व साध्य त्याच्या अनुभवाला आलेलें असल्यामुळें तो भक्तिप्रेमावांचून कसलीही अपेक्षा करीत नाहीं. “ सकळयोगांचें योगगव्हर । वेदांतनिजभांडार । सकळसिद्धींचें परम सार। भक्ति साचार हरीची ॥ ५४१ ॥ निजभाग्याची परमजोडी । महासुखाची आवडी गाढी । सकळ गोडियांची परमगोडी । भक्ति रोकडी श्रीहरिची ॥ ५४२ ॥ ” ( एकनाथी भागवत अ० १४ ). तो **अमृत** म्हणजे अमर होतो. त्याला मरणाची भीति रहात नाहीं. ‘मृत्योः स मृत्युमाप्नोति’ ‘विद्ययाऽमृतमश्नुते’ इत्यादि श्रुतिवाक्यांत सांगितल्याप्रमाणें तो मृत्यूला मारून अमर होतो. भक्तिप्रेमामृत निरंतर प्राशन करणाऱ्या तुकोबारायांनीं ‘मरणा हातीं सुटली काया,’ ‘आपलें मरण पाहिलें म्यां डोळां,’ ‘मरण माझें मरोनि गेलें,’ इत्यादि अभंगांतून आपण अमृतत्वाला पोहोंचल्याचें स्पष्ट सांगितलें आहे. ‘मरणाही आधीं राहिलों मरोनी’ हेंच अमृतत्व होय. तो **तृप्त** होतो. त्याला कसलीही इच्छा रहात नाहीं अमृत पिणाऱ्याचें चित्त क्षुद्र विषयांवर कशाला जाईल? अंतरीं महासुखीं गुंतलेला तो भक्त ऋद्धिसिद्धि अंगावर येऊन आदळल्या तरी त्यांजकडे ढुंकूनही पहात नाहीं, मग तो हीन विषयांकडे कशाला पाहील ? ज्याला स्वसुखानुभव नाहीं म्हणजे घरची सुखसंपत्ति भोगावयाला नाहीं तोच पंचविषयांच्या घरीं मधुकरीचे पांच तुकडे मागावयाला जाईल! “सदा नामघोष करूं हरिकथा। तेणें सदा चित्ता समाधान ॥ १ ॥ सर्व सुख ल्यालों सर्व अलंकार । आनंदें निर्भर

डुल्लतसों ॥ २ ॥" असें म्हणणारे भक्त नित्यतृप्त असतात, हें कांहीं वेगळें सांगावयाला नको.

( ५ ) भक्तिसुख घोटणारा परम भक्त कशाचीही **वांछा** करीत नाहीं, कारण त्याला प्राप्तव्य कांहीं उरलेलेंच नसतें. स्वप्नांतली पावली, पांच रुपये व पांचशें रुपये जागृत पुरुषाला सारखेच असतात, कारण मुळीं स्वप्नच मिथ्या असें तो जाणत असतो. त्याप्रमाणें सर्व सृष्टि नाशवत व मायिक असा बोध ज्या भक्ताच्या ठिकाणीं नित्यजागृत असतो तो कोणतींहि नश्वर सुखें तुच्छच मानणार. जो स्वर्गसुखावर लाथा मारतो, तो मृत्युलोकच्या सुखांना कसा भुलणार ? " जो आपुलेनि नागरपणें । इंद्रभुवनातें पावळें म्हणे । तो केंवि रंजे पालवणें । भिल्लांचेनि ? ॥ जो अमृतातें ठी ठेवी । तो जैसा कांजी न सेवी । तैसा स्वसुखानुभवी । न भोगी रिद्धि ॥ ३६४ ॥ " (ज्ञानेश्वरी अ. २ ) आपल्या ऐश्वर्यानें डोलत राहणारा पुरुष इंद्रभुवनाला जर तुच्छ लेखतो तर तो भिल्लांच्या झोंपडीला कसा भुलेल ? अमृताला नाक मुरडणारा काय कांजी सेवील? त्याप्रमाणेंच भक्तिसुखामृत अखंड प्राशन करणाऱ्या भक्ताची कशावरहि वांछा राहणार नाहीं. ज्याला कसलीही वांछा नाहीं तो कशाबद्दलही **शोक** करणार नाहीं. जायचें तें जाईल व रहायचें तें राहील, असा त्याचा निश्चय असतो. मरक्या वस्तु सर्व जाणार व अमर वस्तु राहणार, हा बोध तो दृढ धरून ठेवतो. "पैं आपुलें जें साचें । तें कल्पांतींही न वचे । हें जाणोनि गताचें । न शोचि जो ॥" ( ज्ञानेश्वरी अ० १२--१९२. ) असा तो शोकरहित असतो. 'उपजे ते नाशे । नाशिलें पुनरपि दिसे' हें तो जाणतो. होणेंजाणें हें सर्व सृष्ट व कल्पित पदार्थांच्या मागें लागलें आहे, हा त्याचा बोध नित्य जागृत असल्यामुळें तो शोकरहित असतो. नारायणाच्या संकल्पानें सर्व होतें जातें हें जाणून श्रीहरीच्या इच्छेला मानून तो सदा प्रेमसुख भोगीत राहतो. तो कसलाही **द्वेष** करीत नाहीं. 'आपणचि विश्व जाहला । तरी भेदभाव सहजाचि गेला । म्हणोनि द्वेष ठेला । तया पुरुषा ॥' (ज्ञानें.-१२--१९१) भेदभाव असेल तर राग आणि द्वेष. विश्वात्मक देवाची नित्यप्रीति ज्याच्या चित्तांत जडली आहे व सर्वांभूतीं ज्याला भगवंत दिसतो तो कोणाचा द्वेष

करील ? म्हणून भक्त द्वेषरहित असतो. "यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति । शुभाशुभपरित्यागी भक्तिमान् यः स मे प्रियः ॥ " ( गीता १२-१७ ) हरीच्या प्रेमसुखानें नित्यतृप्त असलेला भक्त ' न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ' असाच असावयाचा. शुभाशुभवासना त्याच्या ठिकाणीं नसल्यामुळें तो रागद्वेषांच्या हेलकाव्यांनीं न डोलतां मेरुप्रमाणें निष्कंप राहतो. तो लौकिक विषयांच्या ठिकाणीं रमत नाहीं. प्राकृत लोक जें दिसेल त्याच्या ठिकाणीं आपलेंपण टाकून झट्दिशीं रमतात, तद्रूप होतात व ती वस्तु आपल्यास असावी असा उत्साह म्ह० हव्यास त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न होतो. भक्ताची अशी गोष्ट नाहीं. विषय पाहिले कीं, सामान्यांची लटपट उडते, ते तदाकार होतात, पण भक्त बाह्य विषयांनीं आपल्या स्थानावरून च्युत होत नाहीं. " देह तरी वरचिलीकडे । आपुलिया परी हिंडे । परी बैसका न मोडे । मानसीची ॥ " असा भक्त भक्कम असतो. खरे बहाद्दर वीर म्हणजे भक्तच होत. हरिप्रेमावांचून ते कशाचीहि चाड बाळगीत नाहींत. त्यांचें चित्त वितृष्ण असतें, मनोधर्म शांत असतात. यामुळें लाभानें ते टिऱ्या बडवूं लागत नाहींत व हानीनें ते खचत नाहींत. ' जैशी स्थिति आहे तैशापरी राहे । कौतुक तूं पाहे संचिताचें ॥ ' असे ते स्वसुखमग्न असतात. आपल्या वांट्याला आलेलें काम चोख म्ह० फलाशा सोडून करणें एवढेंच त्यांना माहीत असतें. ' आलें भागा तें करितों । तुझें नाम उच्चारितों ॥ ' ही भक्तांची बैठक स्थिर असते. ' नटलेनि लाघवें । नटु जैसा न झकवे । तैसे गुणजात देखावे । न होनियां ॥ ' १९१॥ ( ज्ञानेश्वरी अ. १४ ) गुणांपासून तो निसटून राहिल्यामुळें त्याला उत्तम बतावणी करितां येते. काम कोणचें व किती महत्वाचें, याचा प्रश्न त्याच्या ठिकाणीं राहत नाहीं. राजाचें पात्र आपलें काम मालकाचे मर्जीप्रमाणें व प्रेक्षकांच्या खुषीप्रमाणें करणार नाहीं तर तो राजा म्हणून त्याला टाळ्या पडत नाहींत, उलटपक्षीं हुजऱ्या आपलें काम फक्कड करील तर टाळ्यांवर टाळ्या पडून ' वन्स मोअर ' ची गर्दी उडून जाते ! गरीब, श्रीमंत, स्त्री, पुरुष, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, क्षूद्र कोठेंही जन्म मिळो, कसलीही परिस्थिति असो, सुखदुःखें,

जयापजय, लाभहानि, स्तुतिनिंदा कसलीही प्राप्त होवो, भगवंताच्या ठिकाणीं निरतिशय प्रेम ठेवून भागा आलेलीं कर्मे निरहंकारबुद्धीनें, कर्तव्यबुद्धीनें, देवाची आज्ञा व इच्छा म्हणून जो आनंदानें करितो तोच खरा भक्त होय व 'न किंचित् वांछति न शोचति न द्वेष्टि न रमते नोत्साही भवति' हें वर्णन खरोखर त्यालाच लागूं पडतें. सर्व सद्गुणांच्या मुळाशीं हरिप्रेम आहे. नीति ही भक्तीची दासी असून तिच्या मागोमाग छायेप्रमाणें फिरणारी आहे; म्हणून भगवत्प्रेम हें जीविताचें खरें सार्थक होय. भक्तिप्रेमसुख ज्याला मिळालें तोच ह्या जगांत त्रिवार धन्य होय.

( ६ ) प्रेमसुखाचा निरंतर आस्वाद घेणारा पुरुष कसा असतो ! तो मस्त असतो. मद्यप्याला मद्याचा जसा कैफ चढतो, त्याला देहाचा आदर रहात नाहीं, त्याला डोळ्यांसमोर दुसरें कोणी दिसत नाहीं, द्वंद्वें त्याला बाधत नाहींत, तो सुखदुःखांला गणीत नाहीं—तसाच हरिप्रेममदिरेचाही भक्तांच्या अंगावर कैफ चढतो ! 'अनुहतीं गुंतला नेणे बाह्यरंग !' 'आंत हरि बाहेर हरी। हरिनें घरीं कोंडिलें' अशा प्रेमानंदाच्या रंगानें भक्त बेहोष होऊन जातो.

शृण्वन्सुभद्राणि रथांगपाणेर्जन्मानि कर्माणि च यानि लोके ।
गीतानि नामानि तदर्थकानि गायन्विलज्जो विचरेदसंगः ॥ ३९ ॥
एवंव्रतः स्वप्रियनामकीर्त्या जातानुरागो द्रुतचित्त उच्चैः ।
हसत्यथो रोदिति रौति गायत्युन्मादवन्नृत्यति लोकबाह्यः ॥ ४० ॥

अर्थः—चक्रपाणि जे भगवान् विष्णु त्यांनीं जे जे अवतार घेतले, ज्या ज्या अद्‌भुत लीला केल्या, व जीं अन्वर्थक नामें धारण केलीं,—जीं लोकांत गाइलीं जात आहेत—तीं प्रभुचीं दिव्य जन्मकर्में व मंगलनामें यांचेंच श्रवण करीत मनुष्यानें सर्व लज्जा सोडून असंगास्थितीनें फिरावें व दुसरी कसलीही इच्छा ठेवूं नयें. मनुष्यानें हें व्रत धरलें म्हणजे आपल्या प्रिय प्रभूच्या नामसंकीर्तनानें त्याचें चित्त द्रवून तो केव्हां हंसतो, केव्हां आक्रोश करतो, केव्हां गात सुटतो व केव्हां केव्हां तर नाचूं उडूं लागतो! याप्रकारें उन्मत्ताप्रमाणें त्याचें वर्तन लोकबाह्य होतें. ह्या श्लोकांवरच्या भाष्यांत नाथमहाराज म्हणतातः—

"गातां पदोपदीं निजसुख। कोंदाटे अधिकाधिक। वोसंडतां परम हरिख। स्वानंदें अलोलिक नाचों लागे ॥ ५७५ ॥ जो मोलें मदिरा खाये। ते मदिरानंदें नाचे गाये। मा जेणें ब्रम्हानंदु सेविलाहे। तो केवि राहे आवरिला ?॥ ५७० ॥ " ( एकनाथी भागवत. अ० २ )

असो. तर भगवत्कीर्तिपान निरंतर करणारा भक्त मत्त होतो, तो स्तब्धही होतो. याची ही स्तब्धता कृतकृत्येतेची द्योतक असते. हस्तपादादि सर्व इंद्रियांची वळवळ थांबते. सर्व इंद्रियांनीं जें कर्तव्य तें केलेलें असतें, त्यांना कर्तव्य म्हणून कांहीं उरत नाहीं. नेत्रांनीं हरीला पाहावयाचें तर न पाहतांही हरि त्यांच्या सन्मुखच असतो. ते पाहतील तरी हरि दिसतो, न पाहतील तरी हरिच दिसतो; मग पहावयाचें काय उरलें ? समर्थांनीं एके ठिकाणीं मौजेनें म्हटले आहे कीं, " आतां मी या रामाला काय करूं ? नको म्हटलें तरी तो दृष्टीपुढून जातच नाहीं ! सदा पहावें तों आपला मागेंपुढें आंतबाहेर आहेच आहे. " अंतर्निष्ठ भक्ताला आपलें सुख तोंडानें बोलवत नाहीं म्हणूनही तो स्तब्ध असतो. मौन हें परमप्रेमाचें लक्षणच आहे. आपल्या इंद्रियांची सदा वखवख चालू असते, त्यांना नेहमीं काहींना कांहीं तरी बाह्य विषय पाहिजे असतो, पण जो 'सर्व सुखाचें आगर। बाप रखुमादेवीवर ॥' त्याच्या प्रेमानें ज्याचीं इंद्रियें नित्यतुष्ट असतात तो स्तब्ध होईल यांत काय नवल !

१ मोरोपंतांनीं ( बृहद्दशम अ० ६५ ) मदिरा आणि भगवत्कीर्ति यांचें साम्य व भेद सुचवून विनोदानें म्हटलें आहे:--

लज्जा, गेह, कुटुंब, धर्मरुचि, भी, देहस्मृतीही गळे
आधी हांसति बाळ कर्मठ भले होती तया वेगळे।
तोंडीं शब्द विचित्र, अश्रु नयनीं, पुण्यर्धि सारी ढळे,
कां पीती मदिराचि मूर्ख ! भगवत्कीर्तिप्रिया नाढळे ? ॥ १ ॥
देहातें विसरे, न मृत्युस गणी, हांसेहि, नाचे, रडे,
लज्जा जाय, नुरेचि रीति पहिली, अन्याचि अंगीं जडे।
हें पानव्यसनीं असे सुख, तरी तें कीर्तिपानीं घडे,
पायीं विश्व पडे, न जाय नरकीं ! कां मद्यप्यां नावडे ? ॥ २ ॥

मुक्काम गांठेतोंवर चालणें असतें, पुढें चालणें खुंटतें. शिधासामग्री आणून स्वयंपाकाचा खटाटोप तृप्ति होईपर्यंतच. कामिनी कांतापाशीं स्थिर होते, त्याप्रमाणें सर्व साधनें हरीपाशीं स्थिरावतात. भक्त स्तब्ध होतो. कारण तो **आत्माराम** होतो. राम पाशीं हृदयांतच आहे. 'तैसा हृदयामध्यें मी राम । असतां सर्व सुखाचा आराम । भ्रांताशीं काम । विषयांवरी ॥६०॥' (ज्ञानेश्वरी अ० ९) ह्याच अर्थानें महिम्नस्तोत्रांतहि 'न हि स्वात्मारामं विषयमृगतृष्णा भ्रमयति' असा उद्गार निघाला आहे. भक्त स्वसुखानें पूर्ण तृप्त असतो. हरि हृदयांतच आहे. तो मनोमंदिरीं आहे. त्याच्या नित्य समागमसुखानें भक्तही आत्मारामच होतो. त्याचीं सर्वेंद्रियें बाह्य विषयांपासून खेंचली जाऊन अंतःसुखांत लीन होतात. "योऽन्तःसुखोन्तरारामस्तथांतर्ज्योतिरेव यः । स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥२४॥" (गीता अ. ५) 'म्हणोनि असो हें आघवें । एथ न बोलणें काय बोलावें । ते खुणाचि पावेल स्वभावें । आत्माराम ॥' (ज्ञानेश्वरी ५–१३६.)



## २ भक्तीचे स्वरूप.



सा न कामयमाना निरोधरूपत्वात् ॥ ७ ॥
निरोधस्तु लोकवेदव्यापारन्यासः ॥ ८ ॥
तस्मिन्ननन्यता तद्विरोधिषूदासीनता च ॥ ९ ॥
अन्याश्रयाणां त्यागोऽनन्यता ॥ १० ॥
लोकवेदेषु तदनुकूलाचरणं तद्विरोधिषूदासीनता च ॥ ११ ॥
भवतु निश्चयदार्ढ्यादूर्ध्वं शास्त्ररक्षणम् ॥ १२ ॥
अन्यथा पातित्याशंकया ॥ १३ ॥
लोकोऽपि तावदेव किंतु भोजनादिव्यापार-
स्त्वाशरीरधारणावधि ॥ १४ ॥

### अर्थ.

भक्तीमध्यें भगवंतावांचून दुसरी कोणतीही कामना नसते. कारण सर्व कामनांचा निरोध हेंच तिचें रूप आहे. निरोध म्हणजे लौकिक व वैदिक कर्मांचा न्यास. न्यास ह्या पदानें देवाच्या ठिकाणीं अनन्यता व तत्प्राप्तीला विरोधी असणाऱ्यांविषयीं उदासीनता असा अर्थ घ्यावा. ईश्वरावांचून अन्य आश्रयांचा त्याग म्हणजे अनन्यता व लौकिक आणि वैदिक कर्मांपैकीं तत्प्राप्तीला अनुकूल असतील त्यांचें आचरण करणें व विरोधी असतील त्यांविषयीं उदासीन राहणें, हा उदासीनता ह्याचा अर्थ समजावा. परमात्मप्राप्ती हेंच नरदेहाचें ध्येय व सार्थक असा निश्चय दृढ करून म्हणजे मुख्य समजून तदनुरोधानें शास्त्ररक्षण करावें, व वेदशास्त्रांच्या आज्ञेप्रमाणें वागावें, नाहीं तर पतित होण्याचा संभव पूर्ण. लौकिककर्मांचेंहि असेंच समजावें. भोजनादि कर्में मात्र शरीर आहे तोंपर्यंत चालवावीत.

## स्पष्टीकरण.

( ७ ) भक्त हरीवांचून कांहींच इच्छित नाहीं. ' न वांछति न रमते' म्हणून वर सांगितलेंच आहे.

तुज मागणें तें देवा । आम्हां तुझी चरणसेवा ॥ १ ॥
आन नेघों देसी तरी । रिद्धी सिद्धी मुक्ती चारी ॥ २ ॥
संतसंगती सर्वकाळ । थोर प्रेमाचा सुकाळ ॥ ३ ॥
तुका म्हणे नाम । तेणें पुरें माझें काम ॥ ४ ॥

ऋद्धिसिद्धीवर लाथा मारणारे भक्त इहलोकींचीं किंवा स्वर्गलोकींचीं कसलींच सुखें मागत नाहींत. त्यांना तीं नकोच असतात. "तुका म्हणे तुझी नलगे दसोडी । परि आहे आवडी दर्शनाची ॥१॥ " असे भक्त निष्काम व फक्कड असतात. येथें देवाविषयींची कामना ही मात्र कामना समजावयाची नाहीं. देव भेटावा, त्यानें आलिंगावें, त्याचे चरण हृदयीं धरावे, त्याचें प्रेम वाढविणाऱ्या संतांच्या मेळ्यांत शिरावें, नामाची अखंड आवड असावी, ह्या कामना भक्ताला अवश्य पाहिजेच आहेत. त्यांचा निरोध सांगितला नाहीं. देव भेटला म्हणजे त्याच्यापाशीं बायको मागावी; मुलें मागावींत, धन मागावें, लौकिक मागावा, बळ मागावें आणि प्रपंच नीट थाटावा, अशा कामनांचा निरोध सांगितला आहे. हरिप्रीत्यर्थ हरिविषयक कामना हव्यात, पण प्रपंचविषयक कामना नकोत. विषय पोटांत ठेवून देवाचें भजन करणें तें खरें भजन नव्हे. तें वाणिज्य आहे, तो देवघेवीचा व्यापार आहे, ती भक्ति नाहीं. सकाम भक्तीचा सर्व साधुसंतांनीं निषेध केला आहे. ती हरीभक्ति नव्हे, विषयभक्ति आहे ! 'निरोधरूपत्वात् ' ह्या पदानें तिला बोळा घातला आहे. अत्यल्पही विषयेच्छा पोटांत आहे तोंपर्यंत शुद्धभक्तीचा लाभ नाहीं. विषय हवेत कां देव हवा, असा आपला आपल्याशींच खरा विचार करावा. विषय हवे असतील तर अजून देव नको आहे, म्हणून समजावें. चित्तांत एक विषय तरी राहतील नाहीं तर हरि तरी राहील, दोन्ही राहणार नाहींत. अंधार व प्रकाश दोघे एकत्र नांदत नाहींत. पोहेही खाईन आणि गीतही गाईन हें व्हावयाचें नाहीं. भागवतांत म्हटलें आहे:—"विष-

यान्ध्यायतश्चित्तं विषयेषु विषज्जते। मामनुस्मरतश्चित्तं मय्येव प्रविलीयते॥ चित्त हरीचें चिंतन करावयाला मोकळें पाहिजे. स्वर्गभोग भोगावयाला मिळाले तरी भक्ताचें चित्त त्यांना कंटाळून हरीचीच इच्छा करीत असतें. "हा अंतराय अवचिता। कां ओढवला श्रीभगवंता। दिविभोग भोगतां। अनुतापी नित्य॥४४३॥" (ज्ञानेश्वरी ६). देवावांचून भक्ताला त्रैलोक्याचें राज्यही नको असतें. स्वर्गलोकाला ज्ञानोबारायांनीं अज्ञानाचा पुण्यमार्ग म्हटलें आहे. तात्पर्य 'प्रपंच वोसरो। चित्त तुझे पायीं मुरो॥' हें भक्ताचें मनोगत असतें. सर्व कामनांना निरोध म्ह. अडसर घालून भक्त तो मार्गच बंद करून टाकतो.

(८) निरोध म्ह. लौकिकवैदिककर्मांचा न्यास असें म्हटलें आहे. भक्तिप्रेम पूर्ण वाढलें म्हणजे सर्वच कर्में जीर्णपत्रांप्रमाणें अपाप गळून पडतात. देहाचीच जेथें शुद्धी उरत नाहीं, तेथें कर्मांचें बंधनही उरत नाहीं, त्याविषयीं बोलावयालाच नको. पण हीं सूत्रें मुख्यतः साधकाकरितां सांगितलीं असल्यामुळें त्यांच्यासाठीं नारदमुनी विचार सांगतात. न्यास म्ह० त्याग नव्हे. भक्तिमार्गांत शिरला कीं, त्यानें सर्व लौकिक व वैदिककर्में टाकावींत, असा अर्थ घ्यावयाचा नाहीं. न्यास कशाचा व कसा करावयाचा तें गीतेंत भगवंतांनींच सांगितलें आहे. 'काम्यानां कर्मणां न्यासं' तो न्यास होय. भक्तानें नित्यनैमित्तिक कर्में करावींत, पण काम्यकर्मांचा न्यास करावा. कर्में चार प्रकारचीं:-नित्य, नैमित्तिक, काम्य व निषिद्ध. निषिद्धकर्में:-मद्यमांससेवन, चौर्य, परदाराभिलाष इ. हीं कर्में निषिद्ध ह्या नांवावरूनच त्याज्य ठरलीं आहेत. काम्यकर्में बंधक होतात, जन्ममृत्यूच्या फेऱ्यांत पाडतात, ह्मणून त्यांचा त्याग सांगितला आहे. नित्य, नैमित्तिक व (व्यवहार सर्वस्वी सुटला नाहीं तोंपर्यंत) लौकिक अशीं तीन प्रकारचीं कर्में करावयाला हवींत. नारदांनीं लौकिक व वैदिककर्में म्हणून जीं सांगितलीं त्यांत वैदिककर्में तींच नित्यनैमित्तिककर्में-वेदशास्त्रपुराणोक्त कर्में-होत. आपण वेदधर्मी लोक वेदशास्त्रपुराणांना मानतों. वेद सर्वस्वी मान्य व शास्त्रपुराणें वेदार्थप्रतिपादक म्हणून मान्य. आतां भक्ति निरोधरूप आहे व निरोध ह्म० लोकवेदव्यापारन्यास असें म्हटलें आहे. त्यांत न्यास ह्म० सर्वस्वी त्याग, असा नारदांचा अर्थ नाहीं.

त्यांनीं त्याचा अर्थ पुढील सूत्रांत विशद केला आहे. 'सर्व कर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी' (गीता ५-१३). कर्मांचा मनानें, चित्तानें न्यास करावयाचा आहे, चित्त कर्मांतून काढून ह्म० कर्मफलाच्या आकांक्षेतून सोडवून हरीकडे लावावयाचें, व देहानें लौकिक व वैदिककर्में करावयाचीं, असा न्यासपदाचा अर्थ सर्वसंमत आहे. 'आलें भागा तें करितों। तुझें नाम उच्चारितों॥' असें तुकोबाराय म्हणतात तें याच अर्थानें. "म्हणोनि जें जें उचित। आणि अवसरेंकरोनि प्राप्त। तें कर्म हेतुरहित। आचरे तूं॥" (ज्ञानेश्वरी ३-७८) "म्हणोनि फळीं लाग। सांडूनि देहसंग। कर्में करावीं हा चांग। निरोप माझा॥"(ज्ञानेश्वरी अ. १८.) इत्यादि अनेक प्रसंगीं गीतेचें खरें रहस्य प्रकट करणाऱ्या ज्ञानेश्वर महाराजांनीं संग आणि फलाशा सांडून कर्में करावींत म्हणून सांगितलें आहे. गीतेचा तिसरा व अठरावा अध्याय मननपूर्वक पाहिल्यास न्यास ह्या पदाचा हाच अर्थ पत्करावा लागेल. ज्या भागवतधर्माचे नारद आद्यप्रवर्तक आहेत त्याचे गीता आणि भागवत हे दोन आधारस्तंभ आहेत व त्यांतून कर्मत्याग म्हणजे संग व फलाशा सोडून विहितकर्माचरण, असाच अर्थ सांगितला आहे व तोच नारदांनीं पुढील सूत्रांत स्पष्ट केला आहे.

(९, १० व ११) ईश्वराच्या ठिकाणीं अनन्य-अव्यभिचारिणी-एकनिष्ठपणाची-एकविधपणाची अखंड भक्ति ठेवावी व ह्या हरिभक्तीला अनुकूल व पोषक असतील तीं वैदिक व लौकिककर्में आचरून तद्विरोधि कर्मांविषयीं उदासीन रहावें असा ह्या तिन्ही सूत्रांचा अर्थ आहे.

(१२, १३ व १४) वरील तिन्ही सूत्रांत हरिभक्तीला प्रामुख्य देऊन तदनुकूल कर्में आचरावींत व तद्विरोधि कर्मांविषयीं उदासीन असावें म्हणून सांगितलें तेंच बाराव्या 'भवतु निश्चयदार्ढ्यादूर्ध्वं शास्त्ररक्षणम्' ह्या सूत्रांत स्पष्ट सांगितलें आहे. हरिभक्तीचा निश्चय प्रथम दृढ कर. हें तुझें आद्य व परमश्रेष्ठ कर्तव्य आहे. हा परमलाभ आहे. हें नरदेहाचें परमसार्थक आहे. हा निश्चय दृढ करून मग शास्त्ररक्षण कर. हरिभक्ति, हरिप्रेम, हरिप्रसाद हें ध्येय-हें परम साध्य असून शास्त्ररक्षण हें साधन आहे, ही गोष्ट विसरूं नये.

शास्त्ररक्षण झालें पाहिजेच पण त्याहून हरिप्राप्ति मुख्यतः झाली पाहिजे. हें अधिक महत्त्वाचें आहे. ह्मणून भक्तिनिश्चय प्रथम दृढ करून मग शास्त्ररक्षण कर. तो दृढ झाला नाहीं तोंवर शास्त्रमार्ग सोडूं नकोस; नाहीं तर हरिभक्तिही नाहीं व शास्त्रमार्गही नाहीं असें होऊन तूं पतित होशील. शास्त्ररक्षण म्ह० वैदिककर्माचरण. ह्याहून लौकिककर्में कमी महत्वाचीं म्हणून 'लोकोपि तावदेव' असें पुढील सूत्रांत सांगून देह आहे तोंवर भोजनादि कर्में चालवावींत–किंबहुना तीं चालावयाचींच–असें म्हणून नारदांनीं हा विषय संपविला आहे.

ह्यांत अनन्यभक्ति आणि शास्त्ररक्षण असे दोन मुख्य मुद्दे आहेत. 'अनन्याश्चिंतयंतो मां' 'मांच योऽव्यभिचारेण' इत्यादि प्रकारें भगवंतांनींच स्वतः गीतेंत अनन्यभक्तीचें गौरव केलें आहे.अनन्यभक्ताचा योगक्षेम चालविणें,त्याल गुणातीत करणें, त्याला मायेंतून सोडविणें, त्याला गुरु मिळवून देणें, बुद्धियोग देणें व ज्ञानदान करणें, आपल्या स्वरूपीं मिळवून घेणें हें सर्व श्रीहरिच करितात. हा मात्र कायावाचामनानें देवाला शरण गेला पाहिजे. "सर्वभावें आलों तुजचि शरण । कायावाचामनेंसहित देवा ।। १ ।। आणिक दुसरें नये माझ्या मना । राहिली वासना तुझे पायीं ।। २ ।।" ही अनन्यभक्तीची जात तुकोबादि भक्तांनीं आचरून दाखविली आहे. हरीची अनन्यभक्ति करतांना भक्तीचा उत्कर्ष होतेवेळीं शास्त्रनियमांचें उल्लंघन–केवळ हरीसाठीं–झालें तरी बिघडत नाहीं. 'तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ' हें भगवंतांचें वचन सर्वथा मान्यच आहे. वेदशास्त्रांच्या आज्ञांचें उल्लंघन केल्यास निःसंशय पतनाची जोड होणार आहे. वेदाज्ञापालन हें प्रत्येकाचें आद्यकर्तव्य आहे. पण हरिप्रेमानें अंतःकरण परमावधीनें उचंबळून गेल्यास वेदशास्त्राज्ञा खालींच रहातात, यासाठींच निश्चयदार्ढ्य प्रथम जास्त महत्वाचें सांगून नारदांनीं त्याच्या खालच्या पायरीवर शास्त्ररक्षणास बसविलें आहे. याचें उदाहरण त्यांनींच पुढें २१ व्या सूत्रांत 'यथा व्रजगोपिकानाम्' म्हणून म्हटलें आहे तेंच होय. वस्तुतः पतिव्रताधर्म पाळणें हा स्त्रियांचा मुख्य धर्म. शास्त्र पातिव्रत्यधर्म शिकवितें. पण गोपींचें श्रीकृष्णपरमात्म्यावर निरतिशय प्रेम असून त्यासाठीं

त्या देहगेहांचें भानसुद्धां विसरल्या. निश्चयदार्ढ्य प्रथम व शास्त्ररक्षण नंतर-
ह्या सूत्राच्या जोरावरच गोपींचें गौरव करितां येतें. माया-कोण तरतो,
या प्रश्नाच्या उत्तरांत (सूत्रें ४६-५१) 'वेदानपि संन्यसति केवलमविच्छि-
न्नानुरागं लभते' असें नारदांनींच पुढें म्हटलें आहे. 'त्रैगुण्यविषया वेदा
निस्त्रैगुण्यो भवार्जुन' असा भगवंतांनीं-'तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते' म्हण-
णाऱ्या श्रीकृष्णांनीं-अर्जुनास बोध केला आहे त्यांतील मर्म हेंच आहे, तथापि
हरिप्रेमावांचून अन्य कोणत्याही कारणासाठीं शास्त्रोलंघन करणें उचित
नाहीं; तसें केल्यास पतन निश्चयानें होईल हें तात्पर्य आहे.

## ३ भक्तीचें लक्षण.

तल्लक्षणानि वाच्यन्ते नानामतभेदात् ॥ १५ ॥
पूजादिष्वनुराग इति पाराशर्यः ॥ १६ ॥
कथादिष्विति गर्गः ॥ १७ ॥
आत्मरत्यविरोधेनेति शांडिल्यः ॥ १८ ॥
नारदस्तु तदर्पिताखिलाचारता तद्विस्मरणे परमव्याकुलतेति ॥ १९ ॥
अस्त्येवमेवम् ॥ २० ॥
यथा व्रजगोपिकानाम् ॥ २१ ॥
तत्रापि न माहात्म्यज्ञानविस्मृत्यपवादः ॥ २२ ॥
तद्विहीनं जाराणामिव ॥ २३ ॥
नास्त्येव तस्मिंस्तत्सुखसुखित्वम् ॥ २४ ॥

**अर्थ.**

आतां वेगवेगळ्या मतांप्रमाणें भक्तीचीं लक्षणें कसकशीं करतात तें पाहूं. पूजादिकांच्या ठिकाणीं प्रेम असणें म्हणजे भक्ति, असें व्यास म्हणतात. गुणकीर्तनांत रंगणें म्हणजे भक्ति, असें गर्गाचार्य म्हणतात. आत्मानुसंधान अखंड ठेवून पूजाकथादि करणें ही भक्ति, असें शांडिल्य म्हणतात. यानंतर नारद स्वतःचें मत सांगतात; सर्व कर्म भगवंताला अर्पण करणें व त्याचें विस्मरण क्षणभर झालें तरी परमव्याकुळ होणें ही भक्ति असें नारद म्हणतात; आणि हेंच खरें आहे. व्रजगोपिकांचें निस्सीम प्रेम हेंच याचें उत्कृष्ट उदाहरण आहे. ह्या गोपींच्या उदाहरणांत श्रीकृष्णाच्या माहात्म्याची त्यांना विस्मृति ( पळभरही ) होत होती, असा अपवाद

( आरोप ) कोणालाही आणतां येणार नाहीं. कृष्ण परमात्मा आहे हें ज्ञान त्यांना नसतें तर ते जारप्रेम म्हणतां आलें असतें. शिवाय प्रियपुरुषाच्या सुखानें सुखी होणें ही निरपेक्षता जारप्रेमांत असत नाहीं.

## स्पष्टीकरण.

( १५ ) नारद ह्यानंतर भक्तीचें लक्षण सांगतात; पण स्वतःचें मत सांगण्यापूर्वी त्यांनीं व्यास, गर्गाचार्य व शांडिल्य यांचीं मतें प्रथम सांगितलीं आहेत. भगवंताची पूजा मोठ्या प्रेमानें करावी असें व्यासांचें मत आहे, त्याचें गुणानुवादकीर्तन करावें हें गर्गांचें मत आहे, व मुख्यतः आत्मानुसंधान कायम ठेवून सर्व विहित कर्मे करावींत असें शांडिल्यांचें मत आहे. ही तीनही मतें आपापल्यापरी योग्यच आहेत. देवाची पूजा तन्मय होऊन करणें ही भक्तिच आहे. पूजा करणें, गुणानुवाद गाणें, आत्मानुसंधान ठेवणें हें सर्व उचितच आहे. यांत वावगें काय आहे? नारदांनीं या मतांचे खंडण केलें नाहीं, कारण यांत विरूद्ध कांहीं नाहीं. पण यांत कांहीं तरी कमीपणा आहे. तो भरून काढण्यासाठीं त्यांनीं आपलें स्वतंत्र लक्षण दिलें आहे. सारांश नारदांनीं व्यासगर्गशांडिल्यांचीं भक्तीचीं लक्षणें तुच्छ करण्यासाठीं आपलें भक्तिलक्षण सांगितलें नाहीं, तर त्या लक्षणांची पूर्तता करण्यासाठींच तें सांगितलें आहे. व्यासादिकांच्या लक्षणांना पोषक असेंच त्यांचें लक्षण आहे. पोषक म्हणण्यास एक आधारही आहे. एक तर कीर्तनभक्ति प्रचारांत आणणारे नारदच आहेत. ते कीर्तनभक्तीचे आद्यप्रवर्तक आहेत तेव्हां 'कथादिष्वनुरागः' ह्या भक्तिलक्षणाला त्यांचा विरोध असणें शक्य नाहीं. दुसरें असें कीं, व्यासांना भागवत ग्रंथ लिहिण्यास व 'उत्तमश्लोकगुणानुवर्णन' करण्यास त्यांनींच प्रवृत्त केलें. महाभारत रचल्यानंतरही व्यासांच्या चित्ताला प्रसन्नता वाटली नाहीं, तेव्हां नारदांनीं त्यांना 'यशो भगवतोऽमलं' म्ह० भगवंतांचें निर्मल यश गाण्यास सांगितलें. भगवंतांचें यशोवर्णन व नामग्रहण ज्यांत आहे असाच ग्रंथ जगाचें पाप नाहींसें करितो व साधुपुरुष त्याचेंच श्रवण, गायन व कीर्तन करितात. 'नामान्यनंतस्य यशोंकितानि यत्। शृण्वंति गायन्ति गृणंति साधवः ॥' यानंतर व्यासांनीं श्रीकृष्णगुणवर्णणपर श्रीमद्भागवत ग्रंथ रचिला. तात्पर्य, नारदांना कीर्तन-

भक्ति प्रियच होती. तसेंच पूजाभक्ति व आत्मानुसंधान हींही त्यांच्या भक्ति-लक्षणांशीं विरुद्ध नाहींत. म्हणून व्यास, गर्ग व शांडिल्य यांच्या भक्ति-लक्षणांना परिपोषक असेंच भक्तिलक्षण नारदांनीं सांगितलें आहे असें वाटतें.

( १६ ) पूजादिकांच्या ठिकाणीं अनुराग असणें ही भक्ति होय, असें व्यासांचें मत आहे. अर्थात् ही अर्चनभक्ति होय. देवासाठीं बाग तयार करून त्यांत गुलाब, मोगरा, जाई, जुई, पारिजातक इ० सुगंधी फुलांचीं झाडें लावणें, त्यांची देवाप्रीत्यर्थ निगा ठेवणें, फुलें, तुळसी, बेल वगैरे आस्थेनें व जातीनें तोडून देवगृहाजवळ हारीनें ठेवणें, देवघर गोमयानें सारवून रांगोळ्या घालणें, स्नानसंध्यादि नित्यकर्में सारून देवासाठीं गंध उगाळणें, देवाला पंचामृतस्नान घालणें, धूपदीप, नैवेद्य, आरती, धूपारती, सर्व पूजा-कर्म सशास्त्र व मनःपूर्वक करणें ही अर्चनभक्ति होय. हें पूजाकर्म प्रेमपूर्वक केलें तरीही देव प्रसन्नच होईल. " कायावाचा आणि मनें । चित्तें वित्तें जीवें प्राणें । सद्भावें भगवंत अर्चणें । या नांव अर्चनभक्ति ॥ २९ ॥ " ( दासबोध, ४. स. ५ ) भगवत्पूजामार्ग व्यासांनीं भागवतांत ( स्कंध ११ अ. २७ ) मध्यें सविस्तर सांगितला आहे तो नाथमहाराजांच्या टीकेसह पाहिला म्हणजे केवळ पूजामार्गानेंही जीव उद्धरेल असें वाटतें. नाथांनीं पूजाविधि सविस्तर सांगून त्याची खूण सांगितली आहे कीं, " आपुलें हृदयीचा चिद्धन । मूर्तीमाजीं अवाहन । पूजांतीं करूनि विसर्जन । देव हृदयीं जाण ठेवावा ॥ ११३ ॥ " आपण पूजा करितों " तेव्हां मूर्तीचें जडपण । निःशेष न देखावें आपण । मूर्ती भावावी चैतन्यघन । मुख्य आवाहन या नांव ॥ २१८ ॥ " पूजेला मुख्य प्रमाण श्रद्धा आहे. पूजादि हरिसेवेचें कर्म करीत असतांना देवाचें अनुसंधान ठेवावें, ' जेणें तुटे माझें अनुसंधान । तें कर्म त्यागावें आपण । जेणें स्वरूपनिष्ठ होय मन । तें समाधान राखावें ॥ ३५१ ॥ " भाविकांनीं पूजाविधि नीट समजून घेण्यासाठीं एकनाथी भागवताचा २७ वा संपूर्ण अध्याय अवश्य पहावा.

( १७ ) गर्गाचार्यांनीं कीर्तनभक्ति सांगितली आहे. देवाच्याच कथा-

ऐकाव्या व गाव्या. पूजाभक्तींत आपण व देव असे दोघेच असतों. कीर्तनभक्तींत बहुधा दुसऱ्या सजातीय भाविकांची संगतिही असते. कीर्तनभक्तींत मुख्यतः सगुणलीला वर्णिलेल्या असतात. 'सगुणचरित्रें परमपवित्रें हरिचीं वर्णावीं ' ह्या लोकप्रिय अभंगांत नाथांनीं " संतसंग अंतररंगें नाम बोलावें । कीर्तनरंगीं देवासन्निध सुखेंचि डोलावें । जेणें करुनी मूर्ति ठसावे अंतरिं श्रीहरिची । कीर्तनमर्यादा हे ऐसी संतांचे घरची " ह्याप्रमाणें कीर्तनभक्तीची वाट दाखविली आहे. कीर्तनरंगीं आपल्या सुखांत आपणच रंगून जावें. " आपुलिल्या सुखस्वार्था । केलीच करावी हरिकथा । " असें सांगून समर्थ म्हणतातः—" करुणाकीर्तनाच्या लोटें । कथा करावी घडघडाटें । श्रोतयांचीं श्रवणपुटें । आनंदें भरावी ॥ १२ ॥ कंप रोमांच स्फुरणें । प्रेमाश्रुसहित गाणें । देवद्वारीं लोटांगणें । नमस्कार घालावे ॥ १३ ॥ " कीर्तनांत निर्गुण आणावयाचेंच झालें तर ' सगुण रक्षून निर्गुण बोलत जावें. ' कीर्तनभक्तींत मुख्यतः सगुणाचीं जन्मकर्में साधुसंतांच्या भक्तीचे दाखले व नामस्मरण इतके विषय येतात. 'कथा त्रिवेणीसंगम । देव भक्त आणि नाम ' असें तुकोबांनीं म्हटलेंच आहे. कीर्तनांत ' जळती दोषांचे डोंगर । शुद्ध होती नारीनर ' हा अनुभवच आहे. कीर्तनानें चित्तांतले संदेह नाहींसे होतात, त्रिविध ताप आटतात, जीवाला विश्रांति मिळते, देहभान हरपतें, मानलज्जादि गळतात, अहंकार नष्ट होतो व तात्काळ हरि जोडतो म्हणून ' टाळ दिंडी हातीं घेऊन नाचा व रामकृष्णहरि म्हणा ' हें हरिप्राप्तीचें सोपें वर्म संतांनीं जीवांना सांगितलें आहे. 'माझेनि नामघोषें । नाहींच करिती विश्वाचीं दुःखें ।' असें कीर्तन संत करीत असतात तेव्हांचा तो कीर्तनानंद कोणीं वर्णावा ? " राया रंका पाड धरूं । नेणती, सानेया थोरां कडसणी करूं । एकसरें आनंदाचें आवारूं होत जगा ॥ २०२ ॥ कहीं एकाधेनि वैकुंठा जावें । तें तिहीं वैकुंठचि केलें आघवें । ऐसें नामघोषगौरवें । धवळलें विश्व ॥ २०५ ॥ तो मी वैकुंठीं नसे । एकवेळ भानुबिंबींही न दिसे । वरी योगियांचींही मानसें । उमरडोनि जाय ॥ २०७ ॥ परी तयापाशीं पांडवा । मी हारपला गिंवसावा । जेथ नामघोष बरवा । करिती माझा ॥ २०८ ॥ कैसे माझ्या गुणीं घाले ।

देशकाळातें विसरले । कीर्तनसुखें सुखावले । आपणपांचि ॥ २०९ ॥ कृष्ण-विष्णुहरिगोविंद । या नामाचे निखिळ प्रबंध । माजी आत्मचर्चा विशद । उदंड गाती ॥ २१० ॥" (ज्ञानेश्वरी अ० ९) ह्याप्रमाणें सर्व साधुसंतांनीं कीर्तनभक्तीचें गौरव केलें आहे. नारदांची मुख्य कीर्तनभक्तीच असल्यामुळें त्यांनीं पुढें ३६ व ३७ ह्या सूत्रांत हरिप्राप्तीचें साधन 'अव्यावृतभजनात् लोकेपि भगवद्गुणश्रवणकीर्तनात्' असेंच सांगितलें आहे. नारदांनीं प्रचलित केलेला कीर्तनभक्तीचा हा संप्रदाय महाराष्ट्रांत ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास, अमृतराय, इत्यादि सर्व संतांनीं चालविला आहे. " मच्चित्ता मद्गतप्राणाः बोधयंतः परस्परम् । कथयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥" (श्रीगीता अ. १०-९) ह्याप्रमाणें भगवंतांनींच गीतेंत कीर्तनभक्ती सांगितली आहे. दोन संत एके ठिकाणीं जमले कीं देवाच्याच गोष्टी सांगतात, ऐकतात; व 'जैसीं जवळिकेचीं सरोवरें । कालवती परस्परें' तशी हरिप्रेमाचीच देवघेव करितात. 'तच्चिंतनं तत्कथनमन्योन्यं तत्प्रबोधनम्' असेंच प्रेमसुखाचें साटेलोटें त्यांच्यांत चालतें. देवाचें प्रेम चित्तांत जमत चाललें म्हणजे सजातीयांशीं देवाच्याच गोष्टींची देवघेव करावीशी वाटते. ज्या हरिगुणांनीं हें विश्व भरून उरलें आहे त्या हरीच्या दिव्यगुणांचीं गाणीं गात नाचत राहणें व त्यांतच आपलेंपण विसरून जाणें हें कीर्तनभक्तीचें वर्म आहे. " तैसेंचि मातें विश्वीं कथित । कथिलेनि तोषें कथूं विसरत । मग तया विसरामाजि विरत । आंगें मनें ॥ " ( ज्ञानेश्वरी १०-१२८ )

( १८ ) आतां शांडिल्यांचें भक्तिलक्षण पाहूं. शांडिल्यांचीं भक्तिसूत्रें प्रसिद्ध आहेत. तीं नारदसूत्रांहून पुष्कळ बिकट व केवळ अद्वैतपर आहेत. आचार्यांनीं विवेकचूडामणींत भक्तीचें लक्षण जसें बांधलें आहे तसेंच शांडिल्यांचेंही आहे. " मोक्षकारणसामग्र्यां भक्तिरेव गरीयसी । स्वस्वरूपानुसंधानं भक्तिरित्यभिधीयते ॥ ३२ ॥" असें आचार्य म्हणतात. आत्मरति, आत्मानुभव हें अद्वैतवाद्यांचें मुख्य तत्त्व आहे. आत्मरति हें भक्तीचें लक्षण कांहीं वावगें नाहीं पण हा अधिकार फार वरचा व विरळ अशा ज्ञानसंपन्न महात्म्यांचा आहे. नारदांनीं या सर्व सूत्रांतून भक्तीचें जें स्वरूप दाखविलें आहे, तें

आमच्या महाराष्ट्र संतांच्या विचारपंरपरेला जास्त धरून आहे. ( सूत्र ८२ पहा. ) देव सगुण व साकार असाच भक्तांना जास्त प्रिय आहे. निर्गुण-स्वरूपाशीं त्यांचा विरोध नाहीं. जें सगुण तेंच निर्गुण, जो साकार तोच निराकार, जें ब्रह्म तेंच श्रीकृष्णस्वरूप हें यद्यपि खरें; तथापि प्रेमळ भक्तांना सगुण-साकार देवच पाहिजे असतो. ज्याच्या पायावर डोकें टेवतां येईल, ज्याची हातांनीं पूजा करतां येईल, ज्याचें रूप डोळे भरून पाहतां येईल, ज्याचें ध्यान करितां येईल, ज्याच्याशीं प्रेमाच्या दोन गोष्टी बोलतां येतील, असा सगुण-साकार देवच भक्तांना फार आवडतो. ब्रह्म सिद्धच आहे तें कोठें पळून जातें ? 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः' ह्यांत सगळें ब्रह्मज्ञान आलेलें आहे. चार दोन वेदांतपर उत्कृष्ट ग्रंथ जाणत्याकडून समजून घेतले म्हणजे शाब्दिक ब्रम्हज्ञान होतें, पण तेंच ब्रम्ह सगुणरूपाची बुंथी घेऊन प्रत्यक्ष प्रगट झालेलें भक्तांना हवें असतें. "नलगे हें मज तुझें ब्रम्हज्ञान । गोजिरें सगुण रूप पुरे ॥ १ ॥" "नको ब्रम्हज्ञान आत्मस्थितिभाव । मी भक्त तूं देव ऐसें करी ॥ १ ॥ दावीं रूप मज गोपिकारमणा । ठेवूं दे चरणांवरी माथा ॥ २ ॥ " " स्वमुखें जी तुम्ही सांगा मज सेवा । ऐसें माझें देवा मनोगत ॥ १ ॥ बोलें परस्परें वाढवावें सूख । पहावें श्रीमुख डोळेभरी ॥ २ ॥ " " काय सायुज्यता मुक्तीसवें चाड । देवभक्त कोड तेथें नाहीं ॥ १ ॥ " इत्यादि अभगचरणांतून तुकोबारायांनीं भक्ताची आर्त कोणत्या जातीची असते, तें दाखविलं आहे. नाथमहाराज भागवतांत ( अ० ११ ) म्हणतातः—"विघुरलें तें तूप होये । थिजलें त्यापरिस गोड आहे । निर्गुणापरिस सगुणीं पाहे । अति लवलाहे स्वानंदु ॥ १४५९ ॥ निर्गुणाचा बोध कठिण । मनबुद्धिवाचें अगम्य जाण । शास्त्रांसी न कळे ऊणखूण । वेदीं मौन धरियेलें ॥ ६० ॥ तैशी सगुणमूर्ति नव्हे जाण । सुलभ आणि सुलक्षण । देखतां जाय भूक तहान । निवताहे मन सप्रेमें ॥ ६२ ॥ जो नित्यसिद्धु सच्चिदानंदु । प्रकृतिरूप परमानंदु । सगुण जाला जी गोविंदु । स्वानंद-कंदू स्वलीळा ॥ ६३ ॥ " ह्यानंतर सगुणरूपाचें मनोहर ध्यान वर्णून नाथराय पुढें म्हणतातः—" दीपकाळिका हातीं चढे । तैं घरभरी प्रकाशु सांपडे । माझी मूर्ति जैं ध्यानीं जडे । तैं चैतन्य आंतुडें अवघेंची ॥ १४९९ ॥ "

तात्पर्य काय कीं, आधीं सगुणप्रेम दृढावलें व सगुणध्यानांत तन्मयता झाली कीं निर्गुणबोध अपाप होतो, असा भक्तांचा अनुभव आहे. ' भक्त्या माम भिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः ' असें देवांचेंही सांगणें आहे. भक्तिपंथांत निर्गुणाची किंमत कमी नाहीं, पण सगुणध्यानांत साधक प्रथम रंगला पाहिजे. तसा तो रंगला म्हणजे 'चैतन्य आंतुडे अवघेंचि ' म्ह. अद्वैतानुभव अपाप होतो, हा कटाक्ष आहे. केवळ अद्वैतवादी व आमचे अद्वैती भक्त यांच्यांत फरक आहे तो हा. निर्गुणांना दोघेही मानतात, दोघांनाही ते हवें, पण गुरुमुखानें अद्वैतशास्त्र श्रवण करून अद्वैतानुभवाला एकदम झोंबायला अद्वैती जातात व सगुणध्यानभजनपूजनद्वारां, सगुणसाक्षात्कारद्वारां निर्गुणपदाला भक्त पोंचतात. शांडिल्यांचें भक्तिलक्षण पहिल्या वर्गाला धरून असल्यामुळें नारद भक्तमतानुसार आपलें भक्तिलक्षण वेगळें सांगावयाला प्रवृत्त झाले आहेत. पूजा, कथा व अद्वैत यांना पुढें करणारीं व्यास, गर्ग व शांडिल्य यांचीं मतें सांगून तीं थोडीं अपुरीं वाटल्यामुळें नारदांनीं वेगळें भक्तिलक्षण केलें आहे. पूजा व कथा यांचें महत्व वर वर्णिलें आहेच, पण त्यांत सुद्धां बहुधा अनुभव असा दिसतो कीं, पूजा किंवा कथा होईतों कांहीं प्रेमळाची वृत्ति कांहीं काळ तन्मय होत असते, पण पूजा किंवा कथा संपली कीं व्यवहारांत चारचौघांसारखेच ते वागतात. पंढरपूरच्या बडव्यांसारखे, देवापाशीं नित्य बसणारे पूजारी किंवा गांवोगांव फिरणारे कथेकरी पाहूनच तुकोबासारख्यांनाही 'पुजाऱ्यांशीं कैचा देव । कथड्यांशीं कैचा भाव ॥१॥' असें वाटतें! हे धनकामनेनें पूजा व कथा करणारे लोक सोडले व आवडीनें करणारे पाहिले तरी बहुधा पूजा व कथा होईपर्यंतच त्यांची वृत्ति चांगली होत असते. पूजा व कथा ह्या बाह्य शारीरक्रिया आहेत. अंतरंगांत सुद्धां प्रेम असेल तरच त्या उपकारक होतील; नाहीं तर बरें सत्कर्म आहे, एवढीच संतुष्टि मानावी लागेल. तात्पर्य, व्यास, गर्ग व शांडिल्य यांचीं भक्तिलक्षणें आपापल्यापरी ठीकच आहेत-एवढ्यापुरती त्यांना मान्यता देऊन नारदांनीं पुढें आपलें भक्तिलक्षण सांगितलें आहे.

(१९।२०) सर्व कर्मं भगवंताला अर्पण करणें, त्याचें अखंड स्मरण करणें व क्षणभरहि विस्मरण झालें असतां परमव्याकुळ होणें, हें नारदांनीं

भक्तीचें लक्षण केलें आहे. आतां सर्व कर्मे भगवंताला अर्पण करणें म्हणजे आपण अहंकार (संग) व फलाशा यांपासून मुक्त होणें होय. भगवंतांनीं गीतेंतही हाच बोध केला आहे. 'यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् । यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ ९–२७ ॥ ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः । अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ॥ ६ ॥ तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् । भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशित-चेतसाम् ॥ १२–७ ॥" हाच उपदेश गीतेंत देवांनीं जागोजाग केला आहे. "मयि संन्यस्य कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा" (३–३०); 'ब्रह्मार्पण ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणाहुतम्' (४–२४); 'मत्कर्मपरमो भव' (१२-१०) 'सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज' ( १८–२६ ) इत्यादि श्लोकांचा भावार्थ हा आहे कीं, कायिक, वाचिक, मानसिक सर्व कर्मे भगवंताला अर्पण करून म्हणजेच त्यांचा संग व फलाशा टाकून आपण मोकळें व्हावें व अनन्यभक्तीनें त्याचें अखंड चिंतन करावें म्हणजे तो जन्ममृत्युरूप भव-सागरांतून उद्धरून नेईल. भागाला आलेलीं वैदिक व लौकिक कर्मे करावीं; पण हें कर्म, मी कर्ता व याचें हें फळ मिळालें पाहिजे ही वासना हें सर्व चित्तांतून काढून टाकावें. मालक देव, आपण त्याचे सेवक. त्यानें काम उठाव ह्मटलें म्हणजे करावयाचें मग त्याचें फळ बरें वाईट कांहींही होवो, अशी बुद्धि ठेवून म्ह० देह प्रपंचाला व चित्त हरीला वाहून त्याचेंच अखंड ध्यान करणें ही भक्ति होय. "मनें वाचा देहें । जैसा जो व्यापार होये । तो मी करित आहें । ऐसें न म्हणे ॥ ११७ ॥ करणें कां न करणें । हें आवघें तोचि जाणे । विश्व चळतसे जेणें । परमात्मेनि ॥ ११८ ॥ माळिये जेउतें नेलें । तेउतें निवांतचि गेलें । तया पाणिया ऐसें केलें । होआवे गा ॥ १२० ॥ आणि जें जें कर्म निपजे । तें थोडेंबहु न ह्मणिजे । निवांतांचि अर्पिजे । माझ्या ठायीं ॥ १२३ ॥" (ज्ञानेश्वरी अ० १२) सर्व प्रपंच देवाचा, मालक देव, असें मानून आपण नाहींसें होऊन जावें. देव विश्वाचा मालक व चालक आहे. "गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृद् । प्रभवः प्रलयः स्थानं । निधानं बीजमव्ययम् ॥" (गीता अ० ९). ह्यावर ज्ञानोबाराय म्हणतात "विश्वश्रियेचा भर्ता । मीचि गा एथ

पंडुसुता । मी गोसावी समस्ता । त्रैलोक्याचा ॥ २८० ॥ आकाशें सर्वत्र वसावें । वायूनें नांवभरी उगें नसावें । पावकें दाहावें। वर्षावें जळें।२८१। पर्वती बैसका न संडावी । समुद्रीं रेखा नोलांडावी । पृथ्वीया भूतें वाहावीं। हे आज्ञा माझी ॥२८२॥ म्यां बोलविल्या वेद बोले। म्यां चालविल्या सूर्य चाले । म्यां हालविल्या प्राण हाले ॥ जो जगातें चाळिता ॥ २८३ ॥ जो होय मज अनन्यशरण । त्याचें निवारीं मी जन्ममरण । यालागीं शरणागता शरण्य । मीचि एक ॥ २८८ ॥" अशा विश्वात्म्या श्रीहरीला सर्वभावानें शरण गेल्यावर मीपणाचा फुंज उरणार नाहीं. तो विश्वात्मा सर्वांचा सूत्रधार आहे, सर्वांची दोरी हालविणारा आहे, आपल्याही शरीररथाचा तोच सारथी आहे, हें जाणून त्याच्या हातीं दोऱ्या द्याव्यात. अर्जुनानें आपल्या रथावर श्रीकृष्णाला बसवून हेंच सुचविलें आहे! लगाम देवाच्या हातीं द्यावा व 'करिष्ये वचनं तव' ह्याप्रमाणें त्याचा हुकूम उठावणारा सेवक व्हावें. आपण आपल्या हातीं लगाम ठेविला तर तो उदासीन होतो व कर्मफळ आपल्याला भोगावें लागतें. तो दिवटा आहे, आपण नुसतें त्याच्यामागें जावें. 'हेचि थोर भक्ति आवडते देवा। संकल्पावी माया संसाराची' असें थोडक्यांत तुकोबारायांनीं सांगितलें आहे. "दारापुतगृहप्राण । करावें भगवंतासी अर्पण । हे भागवतधर्म पूर्ण । मुख्यत्वें भजन या नांव ॥२९८॥ हेतुक अथवा अहेतुक । वैदिक लौकिक स्वाभाविक । भगवंतीं अर्पे सकळीक । या नांव देख भागवतधर्म ॥३४६॥ उदकीं तरंग अति चपळ। जिकडे जाय तिकडे जळ। तैसें भक्ताचें कर्म सकळ। अर्पे तत्काळ । भगवंतीं ॥३४७॥" (एकनाथी भागवत अ० २). असो, देवाचें व सर्व भक्तांचें जें जीवांना सांगणे आहे तेंच नारदांनीं भक्तिलक्षणांत 'तदर्पिताखिलाचारता' ह्या पदांत सांगितलें आहे. सर्व कर्में देवाला अर्पण करून चित्त प्रपंचांतून मोकळें करावें, तें श्रीहरीला अर्पून अखंड त्याचेंच भजन करावें आणि तें हरिचरणीं प्रेमानें इतकें दृढ जखडून टाकावें कीं, त्याला पळभरही तें पद सोडून जावेंसें वाटूं नये; इतकेंच काय, पण वियोग होतांच 'जीवनावेगळी मासोळी' तसें तें अत्यंत व्याकुळ व्हावें हें नारदांनीं

भक्तीचें लक्षण केलें आहे. तुकोबांनीं " हेंचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥ १ ॥" हेंच देवापाशीं मागितलें आहे. विस्मरणाभव म्हणजेच अखंड स्मरण. ' तुका म्हणे असो सुखें । गाऊं मुखें विठ्ठल ॥ ' नारदांनीं नुसतें ' स्मरण ' म्हटलें असतें तरी चाललें असतें, पण 'विस्मरणे परमव्याकुलता ' हें पद घालून प्रेमाची तीव्रता सुचविली आहे. ' हरी तुझें नाम गाईन अखंड । यावीण पाखांड नेणें कांहीं ॥ ' यांत तुकोबांनीं नामस्मरणावांचून इतर सर्व कर्मांना पाखांड म्हटलें आहे. नामस्मरणानें तन्मयता होते व ' आठवाचि नाहीं सुखदुःखा ' असें होऊन जातें. सर्व देवाचें म्हणून देवाला सर्व कर्में अर्पण करणें व त्याच्या अखंडस्मरणांत राहतां राहतां पळभरही विस्मरण झालें तर व्याकुळ होणें हें भक्तीचें लक्षण नारदांनीं सांगितलें आणि हेंच पुन्हां निश्चयानें 'अस्त्येवमेवम् ' ह्याप्रमाणें सांगून असें उदाहरण दाखविण्यास ते पुढें सरसावले.

( २१-२४ ) नारदांनीं आपल्या भक्तिलक्षणाला बरोबर उतरणारें उदाहरण गोपींचें दिलें आहे व गोपींच्या श्रीकृष्णभक्तीचें मर्म २२ व २४ सूत्रांत दोन सुंदर मुद्दे पुढें करून विशद केलें आहे. गोपी बहुधा सर्व विवाहित स्त्रिया असून कुलीन होत्या. त्यांना आईबाप, पतिपुत्र, जावानणंदा, सासुसासरे, दीरभावजया सर्व आप्त असून त्यांचें श्रीकृष्णाच्या ठिकाणीं निरतिशय प्रेम होतें, व हें त्यांच्या पतींलाही माहीत होतें. श्रीकृष्ण परमात्मा आहे हें गोपींना ठाऊक होतें. श्रीकृष्णाचें ईश्वरत्व पळभरही त्या विसरत नव्हत्या व कृष्णसुखानें सुखी होऊन जाण्याइतकी दिव्य निरपेक्षता त्यांच्या प्रेमांत होती. जारांच्या प्रेमांत ह्या दोन्ही गोष्टी नसतात. कामी स्त्रियांचें परपुरुषांवर जें प्रेम असतें त्यांत तो परपुरुष कोणी महात्मा आहे अशी त्यांची बुद्धि नसते. तोही आपल्यासारखा विषयलंपट अजितेंद्रिय क्षुद्र प्राणी आहे हें त्यांना माहीत असतें. शिवाय त्या केवळ कामभोगार्थ त्याशीं रत होत असल्यामुळें त्याच्या सुखानें सुखी होण्याइतकी आत्मनिरपेक्षता त्यांच्या ठिकाणीं शक्यच नाहीं. तेव्हां गोपींच्या श्रीकृष्णप्रेमाची मीमांसा करितांना पुढील चार गोष्टी लक्षांत ठेवाव-याच्या आहेतः—

( १ ) तदर्पिताखिलाचारता:—गोपींनीं आपलें तनमनधन श्रीकृष्णाला

वाहिलें होतें. त्यांना जागृतींत व स्वप्नांतही श्रीकृष्ण दिसत होते. त्यांच्या सर्व कर्मांची मोहर श्रीकृष्णाकडे होती. श्रीकृष्णाचें दिव्य रूप व गुण पाहून त्या देहभाव विसरून जात. श्रीकृष्णाच्या गोष्टींपुढें त्यांना संसाराच्या भाकडकथा आठवत नसत. श्रीकृष्णप्रेमापुढें त्यांना देहगेह, पतिपुत्र इ० सर्व तुच्छ झाले होते. त्या संसाराला पूर्ण विटल्या असून अंतर्बाह्य कृष्णमय झाल्या होत्या.

( २ ) **तद्विस्मरणे परमव्याकुलता**:—रासक्रीडाप्रसंगीं मध्येंच श्रीकृष्ण एकदम गुप्त झाले तेव्हांची त्यांची व्याकुळता मोठमोठ्या भक्तांनाही मोहून टाकीत आली आहे. भागवतांतील रासपंचाध्यायी व त्यांतील गोपीगीत पाहिलें म्हणजे ईश्वरभक्तीची सीमा गोपींनींच करून दाखविली आहे असें मनाळांस वाटल्यावांचून राहणार नाहीं. त्यांचा शोक ऐकून पाषाणाचेंही चित्त उलेल.

( ३ ) **माहात्म्यज्ञानः**—श्रीकृष्णाचीं जन्मापासूनचीं सर्व अद्भुत चरित्रें त्यांनीं पाहिलीं असल्यामुळें तो साक्षात् परमात्मा आहे याचें पूर्ण ज्ञान त्यांस होतें व ह्या त्यांच्या भावनेंत तो क्वचित् लीलेनें खंड पाडी त्याशिवाय सहसा खंड पडला नाहीं.

( ४ ) **तत्सुखसुखित्वम्**:—श्रीकृष्णावर कसलाही प्रसंग आला तरी तो परमेश्वर असून सर्व संकटांतून पार पडेल हें माहीत असूनही प्रेमातिशयामुळें त्यांच्या वृत्ति घाबऱ्या होत व श्रीकृष्णाच्या सुखांत त्या आपलेंपण विसरून विरघळून जात. ह्या चार कारणांमुळें भक्तोत्तम गोपींचें उदाहरण नारदांनीं दिलें आहे तें सर्वस्वीं योग्य आहे.

गोपींची श्रीकृष्णाच्या ठिकाणीं मनुष्यबुद्धि नव्हती. तो परमेश्वर आहे असें त्या जाणून होत्या. जन्मादारभ्य श्रीकृष्णाचीं लोकोत्तर दिव्य चरित्रें त्यांनीं पाहिलीं होतीं. श्रीकृष्णाचें परमसुंदर रूप व त्याच्या मुरलीचा मधुर ध्वनि त्यांनीं या वेडावून गेल्या होत्या. "मनें हरिरूपीं गुंतला वासना। उदास या सना गौळियांच्या॥" हा तुकोबांचा अभंग पहावा. श्रीकृष्ण साक्षात् ईश्वर, सर्वांतर्यामी, गुणातीत, सर्वसाक्षी होते. गोपींचें गृहिणी म्हणून पतिपुत्रांवर प्रेम असावयास पाहिजे होतें. पण त्यांच्या सर्व प्रेमाचा विषय एक श्रीकृष्ण झाल्यामुळें त्याला परमार्थदृष्टीनें 'व्यभिचार' असें

कौतुकानें नांव दिलेलें आहे. गोपी कामानें प्रथम प्रवृत्त झाल्या खऱ्या, पण त्या मन्मथमन्मथानें त्यांना निष्काम केलें व त्यांचें निरुपचार प्रेम श्रीकृष्णावर जडलें. " निरुपचारा प्रेमा। विषो होय जे प्रियोत्तमा। तें दुजें नव्हे कीं आत्मा। याचिलागीं ॥ " असें ज्ञानोबारायांनीं म्हटलें आहे. ज्याचें अखंड ध्यान होतें तद्रूपता प्राप्त होते, हा न्याय आहे. ' ज्याचें जया ध्यान। तेंचि होय त्याचें मन '. ज्ञानोबारायांनीं म्हटलें आहे कीं कोणत्याही कां मिषानें होईना—' भक्ति कां विषयविरागें अथवा वैरें ' भक्तीनें, ज्ञानानें, द्वेषानें, छलबुद्धीनें, पण देवाकडे चित्त वळलें म्हणजे देवाचेंच पद मिळतें. " पाहे पां वल्लभाचेनि व्याजें। तिया व्रजांगनाचि निजें। मज मिनलिया काय माझें। स्वरूप नव्हती ? ॥४६५॥ नातरी भयाचेनि मिसें। मातें न पविजेचि काय कंसें ? । कीं अखड वैरवशें। चैद्यादिकीं ? ॥ ४६६ ॥ अगा सोयरेपणेंचि पांडवा। माझें सायुज्य यादवा। कीं ममत्वें वासुदेवा—। दिकां सकळां ॥ ४६७ ॥ नारदा ध्रुवा अक्रूरा। शुका हन सनत्कुमारा। इयां भक्ता मी धनुर्धरा। प्राप्य जैसा ॥ ४६८ ॥ तैसाची गोपिकांसि कामें। तया कंसा भयसंभ्रमें। येरां घातका मनोधर्में। शिशुपालादिकां ॥ ४६९ भलतिया जाति जन्मावें। मग भजिजे कां विरोधावें। परि भक्ता का वैरिया व्हावें। माझियाचि ॥४७२॥" ( ज्ञानेश्वरी अ. ९ )

तात्पर्य, गोपिका कामबुद्धीनें जरी प्रथम श्रीकृष्णाकडे वेधल्या गेल्या तरी त्या कृष्णरूप होऊन निष्कामच झाल्या. गोपींना श्रीकृष्णाचा वेध दृढ लागला होता " तुका म्हणे छंद। येणें मोहिलीं गोविंदें ॥ " गोपींच्या वेधाबद्दल **नाथमहाराज** म्हणातात:—

" रासक्रीडा गोपिकांप्रती। कोणी म्हणेल कामासक्ती। तेथ कामाची कैंचि प्राप्ती। ऐक निश्चिती उद्धवा ॥ १५० ॥ जेथ मी क्रीडें आत्मारामू। तेथ केविं रिघे बापुडा कामू। माझे कामें गोपिका निष्कामू। कामसंभ्रमू त्यां नाहीं ॥ १५४ ॥ जेथ माझा क्रीडासुखकल्लोळ। तेथ कोण स्मरे काळ वेळ। गोपिकांचें भाग्य प्रबळ। माझें सुख केवळ पावल्या ॥ १६० ॥ ऐसियांसी म्यां निचाडतां। कृतघ्नाचे परी सांडूनि जातां। माझ्या वियोगकाळींची व्यथा।

पाषाण पाहतां उतटती ॥ १७५ ॥ यापरी मजवेगळ्या असतां । मागे माझी कथावार्ता । सदा माझें स्मरण करितां । मदाकारता पावल्या ॥ १७६ ॥ करितां दळणकांडण । माझे दीर्घस्वरें गाती गुण । कीं आदरिल्या दधिमंथन ! माझें चरित्रगायन त्या करिती ॥ १७७ ॥ करितां सडासंमार्जन । गोपिकांसी माझें ध्यान । माझेनि स्मरणें जाण । परिये देणें बाळकां ॥ १७८ ॥ गायींचें दोहन करितां । माझे स्मरणीं आसक्तता । एवं सर्वकर्मीं वर्ततां । माझ्या विसराची वार्ता । विसरल्या ॥ १७९ ॥ करितां गमनागमन । अखंड माझ्याठायीं मन । आसन भोजन प्राशन । करितां मद्ध्यान तयांसी ॥ १८० ॥ ऐसी अनन्य ठायींच्या ठायीं । गोपिकांसि माझी प्रीति पाहीं । त्या वर्ततांही देहगेहीं । माझ्याठायीं विनटल्या ॥ १८२ ॥ यापरी बुद्धि मदाकार । म्हणोनि विसरल्या घरदार । विसरल्या पुत्रभ्रतार । निजव्यापार विसरल्या ॥ १८३ ॥ विसरल्या विषयसुख । विसरल्या द्वंद्वदुःख । विसरल्या तहानभूक । माझेनि एक निदिध्यासें ॥ १८४ ॥ जेणें देहें पतिपुत्रातें । आप्त मानिलें होतें चित्तें । तें चित्त रातलें मातें । त्या देहातें निरसोनी ॥ १८५ ॥ विसरल्या इहलोक परलोक । विसरल्या कार्यकारण निःशेख । विसरल्या नामरूप देख । माझें ध्यानसुख भोगितां ॥ १७६ ॥ जेविं का नाना सरिता । आलिया सिंधूंत ठाकितां । येथें पावोनि समरसता । नामरूपता विसरल्या ॥ १८८ ॥"
( एकनाथी भागवत अ० १२ )

गोपींची भगवद्भक्ति इतकी निरुपम होती कीं कबीरासारख्यांनाही आपली भक्ति त्यांच्यापुढें तुच्छ वाटली ! काशीस एकदां कबीरांच्यामागें हजारों भाविकजन त्यांच्या नांवाचा जयजयकार करीत धांवत असतांना **कबीर** साहेब झटकन् मागें वळून म्हणालेः—

### दोहा.

कबीर कबीर क्या कहे जा जमुनाके तीर ।
एक गोपिके प्रेममे बहे गये कोटि कबीर ॥ १ ॥

' कबीर कबीर काय करीत बसलांत ! यमुनेच्या तीरावर जा. एकेका गोपीच्या प्रेमांत कोटयवधि कबीर वाहून जातील ! '

---

# ४ भक्तिसाधनविचार.

——:❀०:❀——

सा तु कर्मज्ञानयोगेभ्योऽप्यधिकतरा ॥ २५ ॥
फलरूपत्वात् ॥ २६ ॥
ईश्वरस्याप्यभिमानद्वेषित्वाद्दैन्यप्रियत्वाच्च ॥ २७ ॥
तस्या ज्ञानमेव साधनमित्येके ॥ २८ ॥
अन्योन्याश्रयत्वमित्यन्ये ॥ २९ ॥
स्वयंफलरूपतेति ब्रह्मकुमारः ॥ ३० ॥
राजगृहभोजनादिषु तथैव दृष्टत्वात् ॥ ३१ ॥
न तेन राजपरितोषः क्षुच्छांतिर्वा ॥ ३२ ॥
तस्मात्सैव ग्राह्या मुमुक्षुभिः ॥ ३३ ॥

## अर्थ.

कर्म, ज्ञान व योग ह्यापेक्षां भक्तिच श्रेष्ठ आहे, कारण भक्ति ही फलरूप आहे व ईश्वरालाही अभिमान आवडत नाहीं आणि दैन्यच प्रिय आहे. ज्ञान हेंच भक्तीचें साधन आहे असें कोणीं म्हणतात, ज्ञान व भक्ति हीं अन्योन्यावलंबी आहेत असेंही कोणीं म्हणतात, पण भक्ति ही स्वयंफलरूपिणी आहे, असें नारदांचें मत आहे. राजगृह व भोजन इत्यादि ठिकाणींही पण असेंच दिसतें. राजवाडा नुसता पाहून आल्यानें कांहीं राजाची प्रसन्नता जोडत नाहीं; किंवा भोजनाची नुसती तयारी पाहून कांहीं भुकेचें निवारण होत नाहीं. म्हणून संसारांतून तरून जाण्याची इच्छा करणारांनीं (मुमुक्षूंनीं) भक्तीचाच मार्ग धरावा.

## स्पष्टीकरण.

( २५-२७ ) ईश्वरप्राप्तीचे मार्ग तीन आहेत; कर्ममार्ग, ज्ञानमार्ग व योगमार्ग. पण भक्तिमार्ग हा ह्या तिन्ही मार्गांहून श्रेष्ठ आहे. हे तिन्ही मार्ग

चुकीचे नाहींत; इतकेंच काय पण त्या त्या मार्गाचें बरोबर मर्म समजून मनुष्य चालला तर ते मार्ग ईश्वराकडेच नेऊन पोहोंचवतील, पण त्या मार्गांत खळगे फार आहेत. कर्माचा कर्मठपणांत, ज्ञानाचा अभिमानांत व योगाचा दंभांत परिपाक झालेला पुष्कळदां दिसतो व कर्मी, ज्ञानी व योगी हे बहुधा गर्वाचे पुतळे बनलेले आढळतात. भक्तिमार्गानें जाणारा मनुष्य देवाकडे स्वामित्व देऊन आपण त्याचा दीन दास बनून राहतो. तो आपल्या बुद्धीची प्रौढी गात नाहीं. माझ्या कर्तृत्वानें, बुद्धीनें किंवा सामर्थ्यानें मी अमुक केलें असें तो समजत नाहीं, तर सर्व करणें देवाचें आहे असें मानून देवाच्या पायीं लीन होऊन जातो. देवाला अभिमान आवडत नाहीं, त्याला दैन्य आवडतें. तुकोबा म्हणतात:–' देव सोयरा देव सोयरा । देव सोयरा दीनाचा ॥१॥'' भक्त असा दीन असतो म्हणून कर्मी, ज्ञानी व योगी अशांपेक्षां देव भक्तांकडेच चटकन् वळतो.

## अभंग.

कृपावंत किती । दीनें बहु आवडती ॥१॥
त्यांचा भार वाहे माथा । करी योगक्षेमचिंता ॥२॥
भुलों नेदी वाट । करीं धरूनि दावी नीट ॥३॥
**तुका** म्हणे जीवें । अनुसरतां एका भावें ॥४॥

एकभावानें, एकनिष्ठेनें हरीला शरण गेलेला भक्त त्याला फार आवडतो. ' जो ये मज अनन्यशरण । तयाचें निवारीं मी जन्ममरण ।' अशी देवाची प्रतिज्ञा आहे. देवाला दैन्य प्रिय आहे, अर्थातच अभिमान प्रिय नाहीं. निर्मानमोह म्ह. अभिमान व मोह ज्यांचे गळाले आहेत अशाच पुरुषांना अव्यय पदाची (श्रीहरिचरणाची) प्राप्ति होते ( गीता १५–५ ). कंस, रावण, हिरण्यकशिपु इत्यादि दैत्य अभिमानानेंच बुडाले; व नारद, ध्रुव, अक्रूर, प्रल्हाद इत्यादि असंख्य भक्त विद्यावयज्ञानतपादिकांचा अहंकार सोडून हरिचरणीं लीन झाल्यानेंच तरले. अहंकारानेंच हरि दुरावतो व दैन्यानें जवळ होतो. म्हणूनच तुकोबांसारखे भक्तराज ''नीचपण बरवें देवा। न चले कोणाचाही हेवा ॥ १ ॥'' ''लहानपण देगा देवा । मुंगी

साखरेचा रवा ॥" असेंच देवापाशीं मागणें मागतात. नम्र होणें, लवणें, लोटांगणें घालणें ह्यासारखी बलवत्तर दुसरी शक्ति नाहीं. वस्तुतः मौज अशी आहे, कीं लहान होणें म्हणजेच मोठें होणें आहे! 'अणोरणीयान्' होणें म्हणजेच 'महतो महीयान्' होणें आहे! 'अणुरेणुया थोकडा' होऊनच 'तुका आकाशाएवढा' झाला! अणुरेणुपेक्षां लहान होणें म्हणजेच 'अहं' निःशेष पुसून टाकणें होय. अहं नेहमींच 'लघु', मर्यादित असतें. तें नाहींसें झालें म्हणजे उरलें तें सगळें बृहत् 'ब्रह्म' च होय! हें 'अहं' दुजेपणाचें भूत उत्पन्न करितें. त्याचा बेपत्ता करून टाकावा कीं मग हरिच उरतो. "दुजें खंडें तरी। उरला तो अवघा हरि" आणि त्याला धुंडायलाही मग लांब नको जायला—'आपणा बाहेरी। नलगे ठाव धुंडावा ॥ १॥' असो. तर अभिमान हा हरीला दुरावणारा असल्यामुळें व कर्मज्ञानयोगादि हरिप्राप्तीच्या साधनांत तो उत्पन्न होण्याचा अधिक संभव असल्यामुळें ह्या साधनांपेक्षां दीनता ज्यानें उत्पन्न होते व अभिमानाचा नायनाट होतो असा भक्तिपंथच अधिक श्रेयस्कर आहे व म्हणून साधकांनीं भक्तीचाच आश्रय करावा. देवांनींच स्वतः उद्धवाला 'भक्त्याहमेकया ग्राह्यः' म्ह० मी केवळ भक्तीनेंच वश होणारा आहें असें सांगतांना म्हटलें आहे कीं "न साधयति मां योगो न सांख्यं धर्म उद्धव। न स्वाध्यायस्तपस्त्यागो यथाभक्तिर्ममोर्जिता ॥ २० ॥ (श्रीभागवत स्कंध ११ अ० १४) भक्तिमार्ग हा वरील तिन्ही मार्गांपेक्षां श्रेष्ठ म्हणण्याचें पहिलें कारण हें आहे. दुसरें कारण असें आहे कीं भक्ति फलरूपिणी आहे. भक्ति ह्म० प्रेम, ह्यापासून दुसरें कांहीं मिळवावयाचें नसतें. प्रेमाचें साजुक, कोंवळें सुख भोगण्यांतच भक्त रंगून जातो. 'मुखीं नाम हातीं मोक्ष' असा हा रोकडा व्यवहार आहे. ह्यांत उधारी नाहीं. जसजशी भक्ति करीत जावी तसतसा आनंद वाढत असतो. 'पूर आला आनंदाचा। लाटा उसळती प्रेमाच्या ॥ १॥' असा हा भक्तिसुखाचा अनुभव आहे. पण केव्हां? 'विठ्ठल सांगडी बांधूं' तेव्हां! जों जों नामस्मरणाचा छंद वाढेल तों तों 'श्रीरंग अंगा येईल.' भक्ति हें केवळ साधन नाहीं तर साध्य आहे. भक्ति हेंच भक्तीचें फल आहे. ह्याला अधिकाराची अपेक्षा नाहीं,

बुद्धिवैभवाची गरज नाहीं, इंद्रियें कोंडावयाचें कारण नाहीं, फक्त एक श्रीहरि पाहिजे अशी अत्यंत आवड उत्पन्न झाली म्हणजे झालें. देव पाहिजे, मनापासून देवच पाहिजे अशी तगमग सुरू झाली कीं तो भक्तीचा सोहळा भोगूं लागतो. कोणत्याही जातीचा, कसल्याही परिस्थितींतला, केवढाही मंदबुद्धीचा, कोणत्याही वयाचा मनुष्य असो–त्याला अंतःकरणपूर्वक देव हवासा झाला, कीं तो भक्तकोटींत प्रविष्ट झालाच. त्याला बाह्य साधनांची अवश्यकता नाहीं; व उपाधींचा अडसर नाहीं. तो देवालाही वेध लावतो.

## अभंग.

गौळियांचीं ताकपिरें । काय पोरें चांगलीं ॥ १ ॥
केवढा त्यांचा छंद देवा । काय सेवा भक्ती ते ॥ २ ॥
काय उपास पडले होते । कण्याभोंवत्या विदुराच्या ॥ ३ ॥
तुका म्हणे कुब्जा दासी । रूपराशी हीनकळा ॥ ४ ॥

भगवंतांनीं ही गीतेंत आपली माया दुरत्यय आहे, म्हणून सांगितलें आहे, पण लागलेंच ' मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ' ( अ० ७–१४ ) असें म्हटलें आहे. माझ्या भक्तांना—'तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकं' मी बुद्धियोग देतों व त्यांचें ' अज्ञानजं तमः ' मी स्वतः नाहींसें करतों; ( अ० १०–११।११ ) असें देवांनीं मोठ्या प्रेमानें सांगितलें आहे. जे सर्व कर्म मला अर्पण करतात व ' अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ' म्ह० अनन्य भावानें माझ्या ध्यानांत रंगून जातात, 'तेषामहं समुद्धर्ता मृत्यु-संसार सागरात्' असें देवांनीं भक्तप्रेमानें आश्वासन ( अ० १२–६।७ ) दिलें आहे. देवाचें असें जितकें पाठबळ भक्तांना आहे तितकें तें कर्मज्ञानयोग-वाल्यांना नाहीं ! देवाला जाणायचेंही भक्तीनें, ' भक्त्या मामभिजानाति ' ( अ० १८–५५ ) व देवाला जाणल्यावरही भक्तीचेंच सुख भोगायचें:—"ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा...मद्भक्तिं लभते पराम्" (अ० १८–५४) अशा प्रकारें भक्तींत आरंभ, भक्तींत प्रगति व भक्तींतच शेवट असल्यामुळें भक्ति ही स्वयंफलरूपिणी आहे असें नारदांनीं म्हटलें आहे, व 'सैव ग्राह्या मुमुक्षुभिः' कर्मज्ञानयोगांकडे चित्त फांकूं न देतां मुमुक्षूंनीं भक्तीचाच आश्रय करावा असें बजावून सांगितलें आहे. सर्व साधुसंतांचा असाच उपदेश आहे.

समर्थांनीं मनाच्या श्लोकांत प्रारंभींच 'मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें' असें सांगितलें आहे. 'चि' पदानें अन्यपंथांची व्यावृत्ति सुचविली आहे हें उघड आहे. त्यांनीं राममंत्राच्या श्लोकांत पहिलाच श्लोक घातला आहे तो हाः--

नको शास्त्र अभ्यास व्युत्पात्ति मोठी। जडे गर्वताठा अभीमान पोटीं।
कसा कोणता नेणवे आजपा रे। हरे राम हा मंत्र सोपा जपा रे॥१॥

'हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा' हाच मुख्य बोध ज्यांत आहे त्या हरिपाठांत ज्ञानोबारायांनीं "योगयागविधी येणें नोहे सिद्धि। वायांचि उपाधी दंभधर्म॥" "जपतपकर्म हरिवीण धर्म। वाउगाचि व्यर्थ श्रम होय॥ असे उद्गार काढले आहेत 'दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया' ह्या श्लोकावर टीका करतांना मायानदींत कर्मठ, ज्ञानी, योगी, जपी, तपी सारे कसे वाहून जातात, याचें ज्ञानोबारायांनीं सुंदर वर्णन केलें आहे. त्यांतील चारच ओव्या पहाः "एक स्वयंबुद्धीच्या बाहीं। रिघालें तयाची शुद्धीचि नाहीं। एक जाणिवेचे डोहीं। गर्वेंचि गिळिले॥ ८३॥ एकीं वेदत्रयाचिया सांगडी। घेतल्या अहंभावाचिया धोंडी। तें मदमीनाच्या तोंडीं। सगळेचि गेले॥ ८४॥ एकीं यजनक्रियेची पेटी। बांधोनि घातली पोटीं। ते स्वर्गसुखाच्या कपाटीं। शिरकोनि ठेले॥ ८९॥ एकीं मोक्षीं लागावयाचिया आशा। केला कर्मबाह्यांचा भरंवसा। परी ते पडले वळसां। विधिनिषेधांच्या॥ ९०॥" हे सगळे मायानदीच्या प्रवाहांत बुडतात, मग तरतात तरी कोण? "येथ एकाचि लीला तरले। जे सर्वभावें मज भजले। तयां ऐलीच थडी सरले। मायाजळ॥ ९७॥" मायानदींत सारेच बुडतात, पण देवाला अनन्यभावानें भजणारे व त्याला प्रेमसर्वस्व अर्पण करणारे भक्त मात्र तरतात. ह्यासाठीं देवाचें भक्तिप्रेमसुखच सर्व साधुसंत मागतात. "भक्तिप्रेमावीण ज्ञान नको देवा। अभिमान नित्य नवा तयामाजी॥ १॥ प्रेमसुख देईं प्रेमसुख देईं। प्रेमेवीण नाहीं समाधान॥ २॥" असें नाथांनीं देवापाशीं मागितलें आहे. ह्यासंबंधानेंः--

अवघ्या वाटा झाल्या क्षीण। कळीं न घडे साधन।
उचित विधिाविधान। न कळे न घडे सर्वथा॥ १॥
भक्तिपंथ बहु सोपा। पुण्या नागवे या पापा।
येणें जाणें खेपा। येणेंचि एके खुंटती॥ २॥

असें तुकोबांनींही म्हटलें आहे. 'सैव ग्राह्या' ह्म० भक्तीचाच आश्रय मुमुक्षु जीवांनीं करावा ह्या नारदांच्याच उपदेशाचा अनुवाद सर्व संतांनीं केला आहे.

(२८-३३) कर्मज्ञानयोगांपेक्षां भक्तिच श्रेष्ठ आहे; कारण ती स्वयंफल-रूप आहे असें नारदांनीं जें वर म्हटलें आहे तेंच दोन उदाहरणें देऊन पुढील पांच सूत्रांत सिद्ध केलें आहे. भक्तीचें साधन ज्ञान आहे, म्हणजे ज्ञानानें ती उत्पन्न होणारी आहे असें कोणी म्हणतात. ज्ञानानें भक्ति व भक्तीनें ज्ञान ह्याप्रमाणें एकमेक एकमेकांच्या संगतीनें उत्पन्न होऊन वाढीस लागतात असें आणखी कोणाचें मत आहे. पण नारदांना हीं दोन्ही मतें पसंत नसून भक्तिच भक्तीचें मूळ व भक्तिच भक्तीचें फळ असें त्यांचें सांगणें आहे. भगवंतांनीं गीतेतही हेंच सांगितलें आहेसें वाटतें. 'भक्त्या मामभिजानाति' ह्म० भक्तीनेंच जीव मला जाणतो व मला जाणून 'ब्रह्मीभूत' झाला, चित्तांतील सर्व वृत्तींचा लय होऊन कडकड नाहींशी होऊन तो 'प्रसन्नात्मा' झाला कीं 'मद्भक्तिं लभते पराम्–' माझी पराभक्ति मग त्याच्या अनुभवाला येते. ज्ञानपूर्वभक्ति व ज्ञानोत्तरभक्ति अशा भक्तीच्या दोन पायऱ्या आहेत. भक्तीनें ज्ञान होतें व ज्ञानयुक्त भक्तीनें पराभक्तीचें सुख मिळतें.

१

भक्तीच्या पोटा मुक्ति पै आली। भक्तीनें मुक्तीतें वाढवीलें ॥ १ ॥
भक्ती ते माता मुक्ती ते दुहिता। जाणोनी तत्वता भजन करी ॥ २ ॥

२

भक्तीचे उदरीं जन्मलें ज्ञान। भक्तीनें ज्ञानासीं दिधलें महिमान ॥१॥
भक्ती तें मूळ ज्ञान तें फळ। वैराग्य केवळ तेथींचें फूल ॥ २ ॥
फूलफळ दोन्ही येरयेरांपाठीं। ज्ञानवैराग्य तेवीं भक्तीचे पोटीं ॥ ३ ॥
भक्तियुक्त ज्ञान तेथें नाहीं पतन। भक्तिमाता तया करीतसे जतन ॥४॥
एका जनार्दनीं शुद्धभक्तिक्रिया। ब्रह्मज्ञान त्याच्या लागतसे पायां ॥५॥

ह्या दोन उत्कृष्ट अभंगांत नाथमहाराजांनीं भक्तीपासूनच वैराग्य व वैराग्याच्या पोटीं ज्ञान उत्पन्न होतें आणि असलें भक्तिमातेच्या कह्यांत वागणारें ज्ञान मात्र पतनाला कारण होत नाहीं असें मोठ्या मौजेनें सांगितलें आहे. भक्तीचा

ताबा सोडून स्वच्छंदानें वागूं लागलें म्हणजे मात्र पतन निश्चित आहे. तसलें उच्छृंखळ ज्ञान खड्डयांत पाडील. ज्ञानानें भक्ति उत्पन्न होते हें म्हणणें खरें नसून भक्तीनेंच ज्ञान उत्पन्न होतें हें खरें आहे. रामकृष्णहरीचें प्रेमानें भजन करणाऱ्या भक्तांच्या दारीं ब्रह्मज्ञान खेळणें होऊन पडलेलें असतें. वरील विवेचनांत शुद्ध ज्ञानाचा धिक्कार करण्याचा हेतु नाहीं, तसें करणें अविचाराचें होईल. भक्तीवांचून शाब्दिक ज्ञान व्यर्थ आहे, भक्तीवांचून ज्ञान अहंकार वाढवून खड्डयांत पाडील, मात्र भक्ति असेल तर सहजींच ज्ञान मिळेल असें सांगण्याचा नारदादिसंतांचा हेतु आहे. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः' ह्या श्लोकार्धांत सर्व ज्ञान आलें आहे. हजारों ग्रंथांतून हेच तीन सिद्धांत विशद करून खुलवून विस्तारानें सांगितले आहेत. यावरील ग्रंथ पाहून मनुष्य ज्ञानसंपन्न होईल व ज्ञानाच्या गोष्टी सांगू लागेल; पण अनुभवाशिवाय तें ज्ञान काय कामाचें ? तो अनुभवाचा रंग भक्तिप्रेमाचा जिव्हाळा असल्यावांचून कधींहि येणार नाहीं. प्रेमाची गोडी चाखूं लागलें पाहिजे. शब्दज्ञानानें राजवाडा डोळ्यांपुढें उभा राहिला, पण चालूं लागून राजवाड्यांत शिरून राजाचा परिचय झाला पाहिजे, राजाची प्रसन्नता जोडली पाहिजे. हजारों भिकारी राजवाडा लांबून पहात असतात; पण त्याचा काय उपयोग! राजाची ओळख झाली पाहिजे. तसेंच देवाचें शब्दज्ञान होऊन भागत नाहीं, त्याची ओळख होऊन कृपा झाली पाहिजे. त्याचप्रमाणें भोजनाचें स्वरूप वर्णन अमृतरायाच्या एखाद्या कटावांतून किंवा मुक्तेश्वरी भारतांतून वाचलें किंवा ऐकलें तरीसुद्धां भुकेचें निवारण होणार आहे काय ? जिलब्या, साखरभात, लाडू यांचीं ताटें पाहून भूक कशी निवणार ? ते पदार्थ तोंडांतच घातले पाहिजेत. खाल्ल्यावांचून गोडी कशी कळणार व तृप्ति कशी होणार ? "बोलाचीच कढी बोलाचाची भात । जेवूनियां तृप्त कोण झाला ?" राजवाडा किंवा भोजनसिद्धि नुसती पाहून उपयोग नाहीं तर राजकृपासंपादन किंवा प्रत्यक्ष भोजन झालें पाहिजे. त्याप्रमाणें शाब्दिक ब्रह्मज्ञानानें कार्यभाग होणारा नसून भक्तिप्रेमानेंच हरीची प्राप्ति करून घेऊन तो आनंद प्रत्यक्ष भोगला पाहिजे.

---

## ५ भक्तीचीं साधनें.



तस्याः साधनानि गायंत्याचार्याः । । ३४
तत्तु विषयत्यागात्संगत्यागाच्च ॥ ३५ ॥
अव्यावृतभजनात् ॥ ३६ ॥
लोकेऽपि भगवद्गुणश्रवणकीर्तनात् ॥ ३७ ॥
मुख्यतस्तु महत्कृपयैव भगवत्कृपालेशाद्वा ॥ ३८ ॥
महत्संगस्तु दुर्लभोऽगम्योऽमोघश्च ॥ ३९ ॥
लभ्यतेऽपि तत्कृपयैव ॥ ४० ॥
तस्मिंस्तज्जने भेदाभावात् ॥ ४१ ॥
तदेव साध्यताम् तदेव साध्यताम् ॥ ४२ ॥

### अर्थ.

भक्तिशास्त्राचे मुख्य प्रवर्तक किंवा भक्तिसुखानुभवी संत भक्तीचीं साधनें कोणकोणतीं आहेत तीं प्रेमानें गाऊन सांगतात. विषयत्याग, संगत्याग, अखंडनामस्मरण, लोकांतही भगवंताच्या गुणकर्मांचें श्रवण व कीर्तन, हीं भक्तिप्रेमाचीं साधनें आहेत; पण मुख्यतः संतसज्जनांची कृपा—म्हणजेच भगवंताचा कृपालेश—जोडला पाहिजे. संतसंग आधीं दुर्लभ आहे, बरें मिळालाच तर अगम्य आहे, पण मिळाल्यास मात्र अमोघ म्हणजे रामबाणासारखा सर्व कार्य करण्यास समर्थ आहे. आणि सत्संग: तरी भगवंताची कृपा झाली तरच मिळणार आहे. संत आणि भगवंत हे एकच आहेत, त्यांत भेद नाहीं म्हणून भगवत्कृपाच (भक्तिप्रेम करून) जोडावी.

### स्पष्टीकरण.

(३४) कर्मज्ञानयोगाहून भक्ति श्रेष्ठ आहे असें सिद्ध केल्यावर नारद भक्तीचीं साधनें सांगतात. भक्तीचा जिव्हाळा मूळांतच पाहिजे हें खरें,

बाह्य साधनांनींही भक्ति उत्पन्न करितां व वाढवितां येते. ' भक्ति मूळांतच नसेल तर उत्पन्न करतां येते काय ? ' असा प्रश्न नेहमीं विचारण्यांत येतो, त्याला नारदांच्या ह्या सूत्रांत चांगलें उत्तर सांपडतें. पाण्याच्या धारेनें खडकही जर फुटतात, तर भक्तीच्या प्रचंड ओघांत सांपडलेला अभक्त पाषाणही फुटेल व त्याच्यांत प्रेमाचा जिव्हाळा उत्पन्न होईल यांत कांहीं शंका बाळगावयास नको. मौज अशी आहे कीं, प्रेम हा जीवाचा स्वभावच असल्यामुळें प्रेमाचा ओलावा ज्यांत नाहीं, असा एकही मनुष्य सांपडणें शक्य नाहीं. ' श्रद्धामयोऽयं पुरुषः ' मनुष्याच्या प्रेमाचे विषय वेगवेगळे असूं शकतील; पण प्रेमच नाहीं असा मनुष्यच सांपडणार नाहीं. कोणाचें देहावर, कोणाचें दारेवर, कोणाचे द्रव्यावर, कोणाचें अपत्यावर, कोणाचें लौकिकावर, अधिक प्रेम असतें; पण प्रत्येकाची प्रेमकला अंशांशानें अनेक सचेतन किंवा जड पदार्थांवर वांटली गेलेली असते. त्या प्रेमकलेला अन्य पदार्थ न देतां पूर्णांशानें श्रीहरीकडेच लावणें, म्हणजे तें प्रेमसर्वस्व हरीला वाहणें याचेच नांव भक्ति. ' प्रेम अमृताची धार । वाहे देवाही समोर ॥ ॥ प्रेमामृताची संपूर्ण अखंड धार देवावर वाहणें म्हणजे प्रेमामृताचे तुषार अन्य नश्वर विषयांकडे न जाऊं देतां सर्व प्रेम एकवटून त्या एकवट, पूर्ण, नित्यप्रेमाचा विषय श्रीहरिच करणें हीच खरोखर भक्तीची व्याख्या करणें योग्य होईल. अशी भक्ति कोणत्या साधनांनीं उत्पन्न होईल याचा विचार नारद यापुढें सांगतात.

( ३५ ) मनुष्यमात्राच्या चित्तांतलें प्रेम विषयांनीं आपल्याकडे ओढून घेतलेलें असल्यामुळें प्रथमच विषयत्याग करण्यास सांगतात. चित्ताचें काम चिंतन करणें एवढेंच असल्यामुळें चित्ताला तुम्हीं विषय दिलेत तर तें विषयांचें चिंतन करील व हरि दिलांत तर हरीचेंच चिंतन करील ! " विषयान्ध्यायतश्चित्तं विषयेषु विषज्जते । मामनुस्मरतश्चित्त मय्ये प्रविलीयते ॥ " असें एके ठिकाणीं भागवतांत म्हटलें आहे. हें सारें आपल्याकडे येतें. छंदानें छंद वाढतो. नाटकें पाहूं लागलां तर नाटकांचेंच प्रेम वाटेल व कीर्तनें ऐकूं लागलां तर कीर्तनांचेंच प्रेम वाढेल. तुम्ही डोळ्यांना नाटकें दाखविणार, कां कीर्तनें दाखविणार, चित्ताची मोहर कोणीकडे फिरवणार हें मुद्याचें आहे; म्हणूनच प्रल्हादांनीं देवापाशीं

४

मागितलें आहे कीं, अविवेकी पुरुषांची विषयांवर जी प्रीति असते तीच माझी तुझ्या ठिकाणीं असो, "या प्रीतिरविवेकानां विषयेष्वनपायिनी। त्वामनुस्मरतः सा मे हृदयान्मापसर्पतु ॥" (पांडवगीता). जीवाला पूर्वसंस्कारबलानें व ह्या जन्मींच्या सतत विषयसेवनानें विषयांचेंच प्रेम वाटत असतें. विषयसुखांहून श्रेष्ठतर सुखाचा अनुभव नसल्यामुळें असें होणें साहजिकच आहे. "तैसा हृदयामध्यें मी राम। असतां सर्व सुखाचा आराम। भ्रांतासि तरी काम। विषयांवरी ॥" (ज्ञानेश्वरी). जो गर्भश्रीमंतीचा सुखसोहळा घरींच भोगूं शकतो ता पंचाविषयांच्या पांच घरीं मधुकरीचे तुकडे मागावयाला कशाला धांवेल? विषयांत सुखाभास असला तरी शाश्वतचें सुख नाहीं. विषयसुख परावलंबी व क्षणभंगुर आहे, ज्या देहाच्या जोरावर विषय भोगावयाचे तो देहच मुळीं नश्वर व मोडका आहे. यासाठीं 'न तेषु रमते बुधः' ज्ञाता पुरुष विषयांत रमत नाहीं. 'विषयभोगीं जें सुख। तें साद्यंतचि जाण दुःख' हा अनुभव सर्वांस मागेंपुढें येतोच म्हणून ज्ञाते पुरुष विषयांना विषवत् त्याज्य समजून त्यांपासून दूर राहतात. विषयविषधर हे पांच मर्मस्थानीं चावून विवेक नष्ट करितात, अज्ञानाची झांपड डोळ्यांवर आणून आपलेपण विसरवितात, ह्मणून महात्मे विषयत्याग करावयास सांगतात. आतां आपणां प्रापंचिकांना सर्वस्वीं विषयत्याग करणें अशक्य असल्यामुळें त्यांनीं त्यांतच थोडा पर्याय काढला आहे. "**विधीनें सेवन। विषयत्यागातें समान** ॥" हा तो पर्याय होय. विधिपूर्वक विषयसेवन हें विषयत्यागासमान होय. अगदीं मोकाट गुरासारखें मन सैराट सोडण्यापेक्षां त्याला नियमाच्या मर्यादेंत ठेविलें म्हणजे तें हळूहळू निर्विषय होईल. विषयांचा समूळ त्याग हा उत्तम, पण तो शक्य नाहीं म्हणून विधिपूर्वक विषयसेवन केलेंत तरी चालेल अशी संतांनीं दयेनें सवलत ठेविली आहे. मैथुन, मांस व मद्य ह्यांकडे जीवांची सहज प्रवृत्ति आहे, पण त्यापासून निवृत्त व्हावें हें अत्यंत इष्ट; तथापि तें कठिण असल्यामुळें विवाहयज्ञाची मर्यादा वेदांनीं घालून दिली आहे. "लोके व्यवायामिषमद्यसेवा नित्यास्तु जंतोर्नहि तत्र चोदना। व्यवस्थितिस्तेषु विवाहयज्ञसुराग्रहैरासु निवृत्तिरिष्टा ॥' (श्रीभागवत ११-५-११).

जन्मप्रसंगानें जो संग झाला त्यावर पुन्हां स्त्रीस्पर्श करावयाचा नाहीं अशा निग्रहानें शुक, भीष्म, मारुति, शंकराचार्य, ज्ञानोबराया, समर्थ इत्यादि जे महात्मे सारा जन्म सोंवळा ठेवून गेले ते बहाद्दर वीर तर खरेच, पण धर्मपत्नीपाणिग्रहण केल्यावर 'प्रजार्थ स्त्रीसेवन। ऋतुकाळीं गमन नेमस्त' हा निर्बंध आमरणांत ज्यांनीं पाळला तेही त्यांच्यासारखेच विषयत्यागी म्हटले पाहिजेत. असो. तात्पर्य काय कीं, विषयत्याग सर्वस्वी होणें उत्तम, पण विधिपूर्वक विषयसेवन हेंही त्याच्या खालोखाल किंबहुना तितकेंच उत्तम आहे यांत शंका नाहीं. समर्थांचें ब्रह्मचर्य आणि नाथांचा गृहस्थाश्रम ह्या दोहोंची योग्यता सारखीच आहे. समर्थांनीं विषयत्यागाचें मर्म दासबोधांत (द० १२ स. ६) फार सांगितलें आहे, 'बहुतीं विषय निंदिले आणि तेचि सेवित गेले।' असा प्रकार असतांना 'देह चालतां विषयत्यागी। ऐसा कोण आहे जगीं?' असा श्रोत्यानें प्रश्न केल्यावर समर्थांनीं 'वैराग्यें करावा त्याग। तरीच परमार्थयोग'। असें म्हणून "सबळ विषय त्यागणें। शुद्ध कार्याकारण घेणें। विषयत्यागाचीं लक्षणें॥ वोळखा ऐसीं॥२७॥" असें उत्तर केलें आहे. शुद्ध म्ह० विध्युक्त विषयआसक्तीनें नव्हे तर कर्तव्य म्हणून-कार्याकारण घेणें ह्यालाच त्यांनीं विषयत्याग म्हटलें आहे. असा हा विषयत्याग केला पाहिजे. नुसता विषयत्याग करूनही भागत नाहीं तर संगत्यागही केला पाहिजे. कार्याकारण विषयसेवन ठेविलें तरी चित्तानें विषयांचा संग-आसक्तियुक्त चिंतन—तरी सोडलेंच पाहिजे. प्रत्यक्ष विषयांचें सेवन बाधक होत नाहीं इतकें चिंतन बाधक होतें. कारण 'संगात्संजायते कामः कामात्क्रोऽधोभिजायते' ही अनर्थपरंपरा संगामुळें उत्पन्न होते. म्हणून संगत्याग अवश्य करावा. संगत्यागाचें मर्म सांपडल्यावर विषयांत राहूनही 'पद्मपत्रमिवांभसा' ह्या दृष्टांताप्रमाणें विचारी पुरुष सोंवळा राहूं शकतो. नाथांसारखे महात्मे संसारांत, विषयांच्या परिसरांत, राहूनही निस्संग असतात. हातपाय, नाकडोळे इत्यादिकांच्या कर्मांचा त्यांना लेप होत नाहीं. विषयाच्या लाथा खाऊन खाऊन कोडगे बनलेल्या पामरांच्या विषयसेवनांत व नाथांसारख्यांच्या विषयसेवनांत फार मोठा फरक आहे. "तो इंद्रियां आज्ञा न करी। विषयांचें भय न धरी।

प्राप्त कर्म नाव्हेरी । उचित जें जें ॥ तो कर्मेंद्रियें कर्मीं । राहाटतां तरी न नियमी । परी तेथिचेचि उर्मीं । झांकोळेना ॥७०॥" (ज्ञानेश्वरी ३). तो बाह्यतः चारचौघांसारखाच दिसतो, खातो, पितो, त्याला स्त्रीपुत्र, लेकी-जांवई असतात, पण कोठें संग म्हणून तो ठेवीत नाहीं. "तोही नेत्रीं पाहे । श्रवणीं ऐकत आहे । परी तेथिंचा सर्वथा नोहे । नवल देखे ॥ ४१ ॥ स्पर्शासि तरी जाणे । परिमळ सेवी घ्राणें । अवसरोचित बोलणें तयाही आथि ॥४२॥ आहारातें स्वीकारी । त्यजावें तें परिहरी । निद्रेचिया अवसरीं । निदिजे सुखें ॥४३॥ पार्था तयाचे ठायीं । हें आवघेंचि आथि पाहीं। परि तो कर्ता नव्हे कांहीं । प्रतीतिबळें ॥४४॥" (ज्ञानेश्वरी अ० ५.) असो, तात्पर्य, सडा असेल तर पूर्ण विषयत्याग व परिग्रही असेल तर विधिपूर्वक विषयसेवन हा विषयत्यागाचा अर्थ आहे. संग मात्र सर्वांसच सर्वस्वी सोडला पाहिजे. 'ऊर्ध्वमूलमधःशाख' असा जो अश्वत्थवृक्ष म्हणजे प्रपंच त्याचा नाश करण्यासाठीं भगवंतांनीं अर्जुनाच्या हातांत असंगशस्त्राचीच कुऱ्हाड दिली आहे. "असंगशस्त्रेण दृढेन छित्वा...ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः" (गीता १५–४). श्रीहरीचें शाश्वत पद प्राप्त होणें असेल तर नारदांनीं सांगितल्याप्रमाणें 'तत्तु विषयत्यागात्संगत्यागाच्च' हेंच आधीं झालें पाहिजे. तुकोबांनींही "मुख्य आधीं विषयत्याग । विधिभागपाळण ॥१॥" असेंच म्हटलें आहे.

( ३६–३७ ) भक्तिसुखाची प्राप्ति होण्यासाठीं चित्तांतून विषयांची हकालपट्टी करण्यास वरील सूत्रांत सांगितल्यावर आतां चित्तांत हरिप्रेम भरण्याचा उपाय सांगतात. विषयांच्या कथा सोडून हरीच्या कथा ऐकाव्यात, विषयी जनांचा संग सोडून विरक्तांचा संग धरावा, विषयांची चर्चा करण्याचें सोडून वाणी हरीच्या कथांना अर्पण करावी. हरीचें अखंड भजन चालवावें, चारचौघे जमले असले तरी हरीच्याच गुणकथा ऐकाव्यात व ऐकवाव्यात. 'श्रोतरि सति वक्तव्यं वक्तरि सति श्रोतव्यं' ह्या न्यायानें प्रेमळ श्रोते भेटले तर आपणच हरिगुण गाऊं लागावें व अनुभवी वक्ते भेटले तर सर्वेंद्रियांचे कान करून परम प्रीतीनें हरिगुण ऐकावेत. ह्याप्रमाणें लोकांतांत वा एकांतांत हरीचें गुणकर्म व हरीचें नाम गाण्यांत रंगून जावें.

असा सतत अभ्यास ठेवला म्हणजे भक्तीचा रंग हळूहळू चित्तपटावर उमटूं लागतो. 'आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः' असें श्रुतिमाउलीचें सांगणें आहे. 'सततं कीर्तयंतो मां ' असें गीतामाउलीचें सांगणें आहे. हरीचें श्रवण कीर्तन ठेवावें हें सांगण्यांत अन्य विषयप्रवृत्तिपर क्षुद्र विषयांचें श्रवणकीर्तन सर्वस्वी सोडून द्यावें हें उघडच झाले. हरीची भक्ति ज्या साधनांनीं वाढेल त्या साधनांचा अंगीकार करून ज्यांच्यायोगानें भक्ति खंडित होईल त्यांचा त्याग करावा. भागवतांत श्रवणकीर्तनासंबंधानें वारंवार सांगितलें आहेः—

तस्मादेकेन मनसा भगवान्सात्वतां पतिः। श्रोतव्यः कीर्तितव्यश्च ध्येयः पूज्यश्च नित्यदा ॥ (स्कंध १–२–१४).

तस्माद्भारत सर्वात्मा भगवान्हरिरीश्वरः। श्रोतव्यः कीर्तितव्यश्च स्मर्तव्यश्चेच्छताऽभयम् ॥ (स्कंध २–१–५).

श्रवणं कीर्तनं ध्यानं हरेरद्भुतकर्मणः। जन्मकर्मगुणानां च तदर्थेऽखिलचेष्टितम् ॥ (स्कंध ११-३-२७).

ता ये शृण्वन्ति गायन्ति ह्यनुमोदन्ति चादृताः! मत्पराः श्रद्दधानाश्च भक्तिं विंदंति ते मयि ॥ (स्कंध ११–२६–२६ ).

प्रल्हादांनीं नवविधा भक्ति सांगितली त्यांत 'श्रवणं कीर्तनं' हे दोन प्रकार प्रथम सांगितले आहेत. ज्या गोष्टी आपण नेहमीं ऐकतों व बोलतों त्यांविषयींच आपणांत प्रेम उत्पन्न होतें असा नियम आहे. विषयांविषयीं जीवाचें जें प्रेम आहे तें तरी विषयांचें श्रवणकीर्तन जास्त होतें म्हणूनच. म्हणून श्रीहरीचेंच श्रवणकीर्तन अधिक अधिक आवडीनें सतत चालू ठेविलें तर त्याविषयींचें प्रेम वाढूं लागेल. म्हणून हरीचें अखंड नामस्मरण व हरीचेच कथालाप यांत रंगून जाण्यास नारद सांगतात. लोकलज्जा सोडून कसलीहि अपेक्षा मनांत न धरितां हरीच्या प्रेमानें हरीला आळवावें, हरीचेच गुण वानावे व ऐकावे, हरिभक्ताचीच संगत धरावी, हरीचें नाम मुखांत व रूप चित्तांत ठेवून त्याच्या प्रेमानें अंतर्बाह्य रंगून जावें, म्हणजे हरीची भक्ति शुक्लपक्षांतल्या चंद्रकलेप्रमाणें वाढत राहून एक वेळ भक्तीची पूर्णिमा होईल. 'अव्यावृतभजन' म्हणजे अखंड नामस्मरण. 'अंतरीं

विश्वास अखंड नामाचा ' ठेवून तुकोबारायांनीं "हरी तुझें नाम गाईन अखंड। यावीण पाखंड नेणें कांहीं ॥१॥" असा निर्धार करून त्याप्रमाणें नामघोषाचा सपाटा चालविला तेव्हांच ते भक्तशिरोमणी ह्या पदवीला पोहोंचले. ३६।३७ हीं दोन सूत्रें 'सदा नामघोष करूं हरिकथा' ह्या अभंग-पादार्धांत तुकोबांनीं आणलीं आहेत. तोच बहारीचा अभंग येथें समग्र देतों:-

## अभंग.

सदा नामघोष करूं हरिकथा। तेणें सदा चित्ता समाधान ॥ १ ॥
सर्वसुख ल्यालों सर्व अलंकार। आनंदें निर्भर डुलतसें ॥ २ ॥
असों ऐसा कोठें आठवचि नाहीं। देहींच विदेही भोगूं दशा ॥३॥
**तुका** म्हणे आम्ही जालों अग्निरूप। लागों नेदूं पापपुण्य अंगा ॥४॥

( ३८–४० ) विषयसंग सोडून अखंड नामस्मरण व हरिकथालाप यांत वाणी वेंचावी म्हणून वर सांगितलें. आतां ज्या एका साधनाचा आश्रय केला असतां वरील तिन्ही गोष्टी साधतात त्या साधनाकडे नारद वळतात, 'मुख्यतस्तु महत्कृपयैव.' महात्म्यांची, साधुसंतांची पूर्ण कृपा झाली कीं सर्व कार्य होतें. सत्संगानें विषय अपाप सुटतात, नामाची गोडी कळूं लागते व अनुभवाला येते आणि श्रवणकीर्तनसुख सहजासहजीं भोगावयाला मिळतें. 'सतां संगतिरेवात्र साधनं प्रथमं स्मृतम् ' म्ह० सत्संगति हें हरिप्राप्तीचें पहिलें व मुख्य साधन आहे. भगवंतांनीं गीतेंत (अ० ४ ) ज्ञानाची महती सांगून बोट दाखविलें आहे संतांकडे ! "तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया। उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥" ह्याचा अर्थ ज्ञानोबारायांच्या अमृततुल्य वाणीनेंच ऐकूं. "तें गा ज्ञान पैं बरवें। जरी मनीं आथि जाणावें। तरी संतांतें भजावें। सर्वस्वेसी ॥१६२॥ जे ज्ञानाचा कुरुठा। तेथ सेवा हा दारवंठा। तो स्वाधीन करी सुभटा। वोळगोनी ॥१६६॥ तरी तनुमनजीवें। चरणासीं लागावें। आणि अगर्वता करावें। दास्य सकळ ॥१६७॥ मग अपेक्षित जें आपुलें। तेंहि सांगतील पुसिलें। जेणें अंतःकरण बोधिलें। संकल्पा नये ॥१६८॥' केवळ शास्त्राध्ययनानें भागत नाहीं, बुद्धिवैभवाच्या जोरावर ग्रंथ वाचून त्यांतील खरें मर्म हातीं लागणार नाहीं, तर स्वतः बोधरूप

झालेल्या संतांचा समागम घडला पाहिजे. दासीपुत्र नारद सत्संगानें तरले व वाल्मीकि, व्यास, ध्रुव इत्यादिकांस कृतार्थ करिते झाले. संत बुद्धीचे डोळे उघडतात, आपलें निजरूप पाहण्यास शिकवितात, त्यांच्या संगतींत विषयवासना मावळतात, हरिप्रेमानें ते अंतर्बाह्य रंगलेले असल्यामुळें त्यांच्या संगतींत प्रेमसुख भोगण्याची पात्रता न बोलतांही ते भाविकांच्या अंगीं आणतात व पात्रता सिद्ध झाली कीं पूर्णकृपा करितात. सत्संग, संतसेवा व संतकृपा हे श्रीहरिमंदिरांत शिरण्याचे तीन चौक आहेत व या अनुक्रमानें गेल्यानें श्रीहरीची जोड होते. संत हे परलोकींचे सखे आहेत. हे मोठे उदार आहेत. हे बळेंच नामामृत पाजतात. नाथरायांनीं म्हटल्याप्रमाणें 'पूर्वपुण्य असतां गांठीं । संतभेटी तैं होय'। आणि संतांची भेट झाल्यावर 'संतभेटीचा आनंदु । सुखसागर परमानंदु ।' प्राप्त होतो. विषयांच्या महानिद्रेंतून संत जीवांना जागवितात. " काय या संतांचे मानूं उपकार । मज निरंतर जागवीती ॥ १ ॥ " असा सत्संगानें कृतार्थ झालेल्या तुकोबांनीं प्रेमोद्गार काढला आहे. संतसंगाची सफळता म्हणजेच सद्गुरुकृपा. आरंभीं संतसंग व शेवटीं गुरुकृपा. संत, सद्गुरु व देव हे वस्तुतः अभिन्न आहेत; पण मुमुक्षूचा जसजसा अधिकार वाढत जातो, तसतसें त्याला या अभिन्नत्वाचें मर्म कळत जातें. सत्संगावांचून कोणीही तरला नाहीं. अज्ञात प्रदेशांतून जातांना जसा दुभाष्या लागतो तसे मुमुक्षूला प्रेमानें विषयप्रदेशांतून उचलून परमार्थप्रदेशांत नेऊन सोडणारे संत लागतात. " संतजना पाढिये एका । जनार्दना काडिये एका । ' संतांना अज्ञ जीवांचीही भाषा कळते व पुढची हरीचीही भाषा कळते ! संत डोळ्यांत अंजन घालतात व पुढला मार्ग खुला होत जातो. " संतांचे संगतीं मनोमार्गें गती । आकळावा श्रीपती येणें पंथें ॥ " अर्जुन श्रीकृष्णाचा सखा खरा; पण ' दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ' असें म्हणून त्यांनीं कृपेनें त्याला दिव्यचक्षू दिले, तेव्हांच त्याला विश्वरूपदर्शन झालें. तात्पर्य काय कीं, ' शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नं ' असें म्हणून श्रीसंत-गुरूला सर्वभावें शरण जावें म्हणजे ते मोह दूर करून ' नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा ' ही योग्यता आणून देतात. असा हा सत्संग दुर्लभ आहे

आधीं पूर्वपुण्यावांचून हा मिळावयाचा नाहीं, मिळालाच तर अगम्य आहे, त्याची खोली कोणाला कळावयाची नाहीं, संत काय काय उपकार करतील हें कळावयाचें नाहीं. सत्संग आधीं दुर्लभ म्हणजे खरे संत कांहीं वाटेवर पडले नाहींत. नाटक्यांची, वैषयिकांची गप्पासप्पा झोडणारांची, स्त्रीस्त्रैणांची व निंदककुटाळाची संगति नित्य व सहज आहे, पण संताची संगति अशी हवी तेथें मिळावयाची नाहीं! दुनियेंत गारगोटया पुष्कळ आहेत पण हिरे थोडे आहेत; 'आणिका सारिखा बहुवस । तैसा न जोडे परीस' फुटक्या-कांचा रगड आहेत, पण उंच मोतीदाणा समुद्राच्या तळींच सांपडावयाचा. अल्पात्मे पुष्कळ पण महात्मा दुर्लभ आहे! असा दुर्लभ महात्माही भेटला तरी तो अगम्य आहे, म्हणजे त्याची ओळख पटून त्यावर निष्ठा बसली तरच उपयोग. महात्मा जवळ असूनही आपली तितकी उंची नसली तर तो ओळखतां येणार नाहीं. आपल्याला हरिभेटीची तळमळ पाहिजे. मग ते दया करून पात्रताही देतात. असा दुर्लभ व अगम्य असा सत्संग खरोखर घडलाच तर मात्र तो अमोघ आहे. रामबाण जसा फुकट जावयाचाच नाहीं, लक्ष्याला भेद केल्याशिवाय रहावयाचाच नाहीं, तसा सत्संग हा लक्ष्य जी परमात्मवस्तु ती पदरांत टाकल्याशिवाय रहावयाचाच नाहीं. असा सत्संगही भगवंताच्या कृपेनेंच प्राप्त होतो. 'बिनु संतसंग बिबेक न होई । रामकृपा-बिन सुलभ न सोई' म्हणजे संतसंगावांचून विवेक होत नाहीं, व रामकृपा झाल्यावांचून संतसंगच मिळत नाहीं असें तुळशीदास म्हणतात. महत्कृपा म्हणजेच भगवत्कृपा. देव व संत एकाच भूमिकेवर असतात. देवाची जी वत्सलता तीच संतांची. देवाचीं जीं लक्षणें तींच संतांच्या अंगांवर उमटलेलीं असतात. संत ते देव, देव ते संत 'ज्ञानी त्वात्मैव मे मतम्' हें देवाचेंच वाक्य आहे. 'वीतरागभयक्रोधाः' इत्यादि लक्षणांनीं युक्त जे संत ते 'पूताः मद्भावमागताः' (गीता ४–१०) भगवद्रूपच होत. 'समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः' (गीता ९–२९) ही भगवंताची व संतांची अवस्था सारखीच होय. म्हणून "तेवीं आम्हां तयां परस्परें । बाहेर नामाचींच अंतरें । वांचूनि आंतुवट वस्तुविचारें । मी तेचि ते ॥" (ज्ञानेश्वरी अ० ९–४११). संत देहाच्या बाजूनें पाहिले तर भक्त

असे वाटतात, पण स्वानुभवाच्या अंगानें पाहिलें तर ' देव ते संत संत ते देव ' हेंच खरें. " तैसें शरीरीं हन कर्मे । तो भक्त ऐसा गमे । परी अंतर-प्रतीतिधर्में । मीचि जाहला ॥ " ( ज्ञानेश्वरी ७–११६ ).

### अभंग.

१.

संतां पोटीं देव वसे । देवा पोटीं संत असे ॥ १ ॥
ऐसा परस्परें मेळा । देव संतांचा अंकिला ॥ २ ॥
संतांठायीं देव तिष्ठे । देव तेथें संत वसे ॥ ३ ॥
**एका** जनार्दनीं संत । देव तयांचा अंकित ॥ ४ ॥

२.

अभेद भजनाचा हरिख । देव भक्त जाले एक ॥ १ ॥
कोठें न दिसे भेदवाणी । अवघी बुडाली काहाणी ॥ २ ॥
हारपलें देवभक्तपण । जनीं जाहला जनार्दन ॥ ३ ॥
**एका** जनार्दनीं देव । पुढें उभा स्वयमेव ॥ ४ ॥

असो. तर ' तस्मिंस्तज्जने भेदाभावात् ' ह्या सूत्रांत नारदांनीं सांगितल्याप्रमाणें देवभक्तांत भेद नाहीं. ह्या नऊ सूत्रांत नारदांनीं भक्तीचीं जीं साधनें सांगितलीं तीं विषयत्याग, संगत्याग, अखंड नामस्मरण, भगवंताच्या गुणांचें श्रवणकीर्तन व सत्संग अशीं क्रमानें आहेत. ह्या सर्व सूत्रांचा एकवट विचार केला कीं, शुद्धाचरण ठेवा, सत्संग धरा व नामस्मरणांत रंगून जा म्हणजे भगवद्भक्तीची जोड होईल असा नारदांच्या सांगण्याचा इत्यर्थ निघतो.

———

# ६ दुःसंगत्याग.

———:०:———

**दुःसंगः सर्वथैव त्याज्यः ॥ ४३ ॥**
**कामक्रोधमोहस्मृतिभ्रंशबुद्धि-**
**नाशसर्वनाशकारणत्वात् ॥ ४४ ॥**
**तरंगायिता अपीमे संगात्समुद्रायंति ॥ ४५ ॥**

## अर्थ.

दुष्ट संगतीचा सर्वथा त्याग करावा, कारण दुष्टसंगतीमुळें काम, क्रोध, मोह, स्मृतिभ्रंश, बुद्धिनाश, सर्वनाश याप्रमाणें एकामागून एक उत्पन्न होऊन शेवटीं सर्वस्वाचा नाश होतो. कामक्रोधादि दुर्विकार तरंगासारखे लहान असले तरी दुष्ट संगतीमुळें समुद्रप्राय मोठे होतात.

## स्पष्टीकरण.

( ४३–४५ ) मागील प्रकरणांत सत्संगाचें महत्व वर्णून आतां त्याचा विरोधी जो दुःसंग त्याचा नारद निषेध करितात. सत्संगानें विषयत्याग सुलभ होतो तर दुःसंगानें विषयाभिलाष उद्दीपित होतो. सत्संगानें निःसंगपणाचा मार्ग सांपडतो, तर दुःसंगानें पुत्रदारागृहादिकांच्या ठिकाणीं अनावर मोह व आसक्ति वाढते. सत्संगानें अखंड भजनाची व हरिस्मरणाची आवड उत्पन्न होते, तर दुःसंगानें स्त्रीधनादिसेवनाचीच चटक वाढून हरीची अत्यंत विस्मृति होतें. सत्संगानें देवाचे कथालाप ऐकावे व गावे असें तद्विषयक प्रेम उत्पन्न होतें, तर दुःसंगानें परमार्थाची अनावड वाढीस लागून लौकिक व वैषयिक गप्पासप्पा व भाकड गोष्टी यांतच मन रमून जातें. सत्संगानें सत्कथा, सदाचार, सच्छास्त्र, सत्कालक्षेप, तीर्थक्षेत्रें, जपतपादि प्रकार, पूजाअर्चा यांविषयीं प्रेम उत्पन्न होतें, तर दुःसंगानें या सर्वांविषयीं अनादार उत्पन्न होऊन ‘ यांत काय ? त्यांत काय ? देवांत काय ? धर्मांत काय ’ असला तर्कटीपणा वाढत जातो. सत्संगानें दुनियेंत जेवढें म्हणून

सत् आहे त्याची प्रीति वाढते, व दुःसंगानें जेवढें म्हणून असत् आहे त्याकडे चित्त ओढलें जातें. सत्संगानें सात्त्विक गुणांचा विकास होतो, दुःसंगानें राजस-तामस प्रकृतींचा परिपोष होतो. सत्संगानें अभय, सत्वसंशुद्धि, दान, यज्ञ, स्वाध्याय, तप इत्यादि दैवी संपत्तीचे गुण अंगीं वाढूं लागतात तर दुःसंगतीनें याचे उलट दंभ, दर्प, अभिमान, क्रोध, पारुष्य, अज्ञान हे आसुरी संपत्तीचे दुर्विकार अंगांत संचरूं लागतात. सत्संगानें देव जोडतो व दुःसंगानें देव दुरावतो. सत्संगानें हरिच सर्वस्व वाटतो व दुःसंगानें प्रपंचांत चित्त मुरून जातें. सत्संगानें निवृत्तिपरता वाढते, दुःसंगानें प्रपंचासक्ति बळावते. सत्संगानें चतुर्विध पुरुषार्थ मिळविण्याचें बळ अंगांत येते व दुःसंगानें दुर्बळपणाचें विषयदास्य प्राप्त होतें. तात्पर्य, सदाचरण, परोपकार व हरिनिष्ठा हीं सत्संगानें प्राप्त होतात व जीव मोक्षमार्गाला लागतो आणि दुराचरण, स्वार्थपरता व पाखांडीपणा दुःसंगानें अंगीं जडून मनुष्य अधोगतीच्या मार्गाला लागतो. सत्संगानें शांतिसुख मिळतें व दुःसंगानें नित्य तळमळ जोडते. सत्संग चंदनाप्रमाणें शीतल व सुखदायी वाटतो व दुःसंग विंचवाप्रमाणें दुःखवेदना देतो. सत्संगांत पदोपदीं सुख व अंतीं परमगति मिळते व दुःसंगांत पदोपदीं दुःख व अंतीं नरकगति प्राप्त होते. असा हा दुःसंग नारद ह्मणतात त्याप्रमाणें सर्वथैव त्याज्य आहे, यांत मुळींच शंका नाहीं. दुःसंगानें आधीं काम म्ह० वासना बळावते, तृष्णा पेटते, हें हवें तें हवें अशी तळमळ सुरू होते. काम हा पहिला खळगा आहे. शास्त्रांच्या सरळ मार्गावरून चालणारी आयुष्याची गाडी कामाच्या पहिल्या धक्क्यानें रेषा सोडून गेली कीं, क्रोध, मोह, स्मृतिभ्रंश, बुद्धिनाश इत्यादि एकामागें एक भयंकर ठोकरा खात उलथीपालथी होऊन घाटाखालीं कोसळत जाते व तिच्या ठिकऱ्या ठिकऱ्या होऊन सर्वस्वी नाश होतो! काम हा पहिला धक्काच जबरदस्त आहे. त्याच्या मागोमाग इतर धक्के सहज येतात. काम मागेल तें मिळालें म्हणजे लोभ व न मिळालें म्हणजे क्रोध उत्पन्न होतो. कामवृक्षाला क्रोध व लोभ ह्या वामदक्षिण बाजूला जाणाऱ्या दोन फांद्या आहेत! कामाच्या तृप्तींत लोभ व अतृप्तींत

क्रोध उत्पन्न होतो*. तृप्तीचे प्रसंग कमी व अतृप्तीचेच जास्त ह्मणून क्रोधाच्या शाखेनें पुढील अधोगतीचें वर्णन केलेलें आहे. क्रोधाच्या पुढें मोहतमाचा आविर्भाव, अंधार सहजच आहे. त्यामुळें स्मृति नष्ट होऊन बुद्धिनाश होतो व अखेर सर्वनाश होतो. काम हा सर्वनाशाचें मूळ कारण आहे. म्हणून देवांनीं स्वतः (गीता ३–३७) ह्मटलें आहे:—

काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः।
महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम्।

कामक्रोध हे कृतांताच्या ठिकाणीं माना असें सांगून ज्ञानोबारायांनीं यांचे पराक्रम बहारीनें वर्णिले आहेत. "हे ज्ञाननिधीचे भुजंग। विषयदरींचे वाघ। भजनमार्गींचे मांग। मारक हे॥ २४१॥ इहीं संतोषवन खांडिलें। धैर्यदुर्ग पाडिले। आनंदरोप सांडिलें। उपडूनियां॥ २५३॥" असे काम, क्रोध, मोह अत्यंत बलिष्ठ असून यांचें जगावर मोठें बंड पसरलें आहे. हे सर्व सात्विक गुणांचा नाश करितात व जीवाला दुःखांत लोटून देतात. हे नरकाचें द्वार असल्यामुळें यांस आवरल्यावांचून परमार्थमार्गांत मनुष्याचें एकही पाउल पुढें पडणार नाहीं. "पोटीं बांधोनि पाषाण। समुद्रीं बाहीं आंगवण। कां जियावया जेवण। काळकूटाचें ॥४३६॥ इहीं कामक्रोधलोभेसीं। कार्यसिद्धि जाण तैसी। ह्मणोनि ठावोचि पुसी। ययांचा गा ॥४३७॥" (ज्ञानेश्वरी, अ० १६.) कामक्रोधलोभ पोटांत ठेवून परमार्थ साधूं पाहणें हें पोटाला पाषाण बांधून बाहुबळानें समुद्र तरून जाण्याच्या किंवा कालकूट भक्षून चिरंजीव होण्याच्या गप्पा झोंकण्यासारखें हास्यास्पद आहे! म्हणून आधीं यांचाच ठाव पुसून टाकावा. यांचा विकास दुःसंगतींत

---

***टीप**—भगवंतांनीं गीतेंत 'संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते' इत्यादि प्रकारें ( गीता २–६२–६३ ) पतनाचे अधोमुखतेचा क्रम दाखविला आहेच, आचार्यांनीं म्हटलें आहे:—

**कामो** बुद्धावुदेति प्रथममिह मनस्युद्दिशत्यर्थजातं। तद्गृह्णातींद्रियास्यैस्तदनधिगमतः **क्रोध** आविर्भवेच्च। प्राप्तावर्थस्य संरक्षणमतिरुदितो **लोभ** एतत्त्रयं स्यात्। सर्वेषां पातहेतुस्तदिह मतिमता त्याज्यमध्यात्मयोगात्॥ ( शतश्लोकी १५ ).

होत असल्यामुळें दुःसंगाचा त्याग करणें ह्मणजेच यांच्या दारावर चिरा मारणें होय. कामक्रोधमोहादिक तरंगरूप असले तरी दुःसंगानें समुद्रप्राय मोठे होतात; दुर्विकार मनांत बीजरूपानें असले तरी दुःसंगानें त्यांचे मोठमोठाले पापवृक्ष होतात. शकुनीमामांच्या संगतीनें दुर्योधनप्रमुख कौरव बुडाले. मंथरादासीचा दुष्ट सल्ला मिळाल्यामुळें कैकेयीचें रामावरील शुद्ध प्रेम लुप्त होऊन भरताला राज्य मिळावें हा **काम** प्रथम उद्भवला. **क्रोध** त्यामुळें वाढून तिची विचारशक्ति लुप्त झाली व दशरथालाही शाप देण्याचा तिला **मोह** झाला. सर्वांचा परिणाम तिचें सौभाग्य नष्ट होऊन **सर्वनाश** झाला! पण हा सारा मंथरेच्या दुःसंगतीचा परिणाम. आपल्या मुलाला राज्यभोग मिळावे या सूक्ष्म भावनेचा तरंग तिच्या पोटांत असला तरी मंथरेच्या संगतीमुळेंच त्या तरंगाचा समुद्र होऊन त्यांत तिचा सौभाग्यरवि बुडाला! असो. तर तात्पर्य काय कीं, कामक्रोधमोहादि घातक मनोधर्म ज्या दुःसंगतींत प्रबळ होऊन सर्वनाश करितात, त्या दुःसंगतीचाच त्याग करावा. दुःसंग सुटला कीं कामक्रोधलोभादि सुटले व हे नाहींतसे झाले कीं आत्मप्राप्तीचा मार्ग खुला झालाच म्हणून समजावें. "तैसा कामादिकीं तिहीं। सांडिला सुख पावोनि जगीं। संग लाहे मोक्षमार्गीं। सज्जनांचा ॥ ४४० ॥ मग सत्संगें प्रबळें। सच्छास्त्राचेनि बळें। जन्ममृत्यूंचीं निमाळें। निस्तरे रानें ॥ ४४१ ॥" (ज्ञानेश्वरी अ० १६). म्हणून दुःसंग सोडून सत्संग धरावा.

---

# ७ मायेंतून कोण तरतो ?

———:०:———

**कस्तरति कस्तरति मायां ? यः संगांस्त्यजति**
**यो महानुभावं सेवते निर्ममो भवति ॥ ४६ ॥**
**यो विविक्तस्थानं सेवते यो लोकबंधमुन्मूलयति**
**निस्त्रैगुण्यो भवति यो योगक्षेमं त्यजति ॥४७॥**
**यः कर्मफलं त्यजति कर्माणि संन्यसति**
**ततो निर्द्वंद्वो भवति ॥ ४८ ॥**
**वेदानपि संन्यसति केवलमविच्छिन्नानुरागं लभते४९**
**स तरति स तरति स लोकांस्तारयति ॥ ५० ॥**

**अर्थ.**

( प्रश्न ) दुस्तर मायेंतून कोण तरून जातो ?

( उत्तर ) जो सर्वसंगाचा परित्याग करितो, जो संतसद्गुरूचा समागम करितो, जो ममत्व सोडतो, जो एकांताचें सेवन करितो, लौकिक बंध तोडून टाकतो, जो गुणातीत होतो, जो योगक्षेमाची चिंता वहात नाहीं, जो कर्मफलाची आकांक्षा बाळगीत नाहीं इतकेंच नव्हे तर हळू हळू कर्मांचाही संन्यास करितो व ह्याप्रमाणें द्वंद्वातीत होतो, जो वेदांचाही संन्यास करून केवळ व अखंड परिपूर्ण अशा भगवत्प्रेमाचा लाभ करून घेतो, तो स्वतः तरतो एवढेंच नव्हे तर लोकांचाही उद्धार करितो.

**स्पष्टीकरण.**

दुस्तर मायानदींतून कोण तरून जातो या प्रश्नाचें ह्या पांच सूत्रांत उत्तर दिलें आहे. मायानदी ही दुरत्यय आहे, ब्रह्मादिदेवांनाही अनुल्लंधनीय आहे, हिच्यांतून तरून जाणाऱ्या वीरांच्या अंगीं कोणते गुण आढळून येतात ते साधकांच्या अभ्यासासाठीं नारदांनीं ह्या पांच सूत्रांत सांगितले आहेत.

आधीं माया मिथ्या का सत्य हेंच मोठें कोडें असतें. ‘ संत म्हणों तरी नासे । असंत म्हणों तरी आभासे । ’ ( नाथभागवत ३–५२ ). मृगजल जसें दिसतें पण नसतें तशी माया आहे. ‘ या मा सा माया ’ याप्रमाणें माया आपल्या अंगानेंच मी ‘ मा म्ह० मिथ्या ’ आहें असें सांगते. मायेला खरेपणाचें अंगच नाहीं. ‘ श्रुतिशास्त्रां मायामाग । पुसतां आरोगिती मूग । मायेसी साचाचें अंग । पाहतां चांग दिसेना ’ ( नाथभागवत ३-५४ ) माया नाहीं मग भासते कां ? तर ती आपल्या संकल्पानें भासते. आपली कल्पना तीच माया. यासाठीं निःसंकल्प व्हावें. त्याला उपाय भगवंताला शरण जावें हाच आहे. हा विषय नाथभागवताच्या तिसऱ्या अध्यायांत उत्तम प्रकारें प्रतिपादिला आहे, तो वाचकांनीं जरूर पहावा. माया मूळांतच नाहीं, पण वासनेच्या ठिकाणीं सारा संसार भासतो. ती वासना नारायणाला अर्पण करून मोकळें व्हावें, एवढाच जीवाचा धर्म आहे. ‘ तरीच हरिदास म्हणवितां श्लाघिजे । निर्वासना कीजे चित्त आधीं ॥ ’ असें तुकोबा म्हणतात. “ अग्निसंकल्पू सूर्या नसे । शेखीं सूर्यकांतींही न दिसे । तळीं धरिलेनि कापुसें । अग्नि प्रकाशे तद्योगें ॥ ५४ ॥ तेवीं शुद्धब्रह्मीं संकल्पू नाहीं । शेखीं न दिसे केवळ देहीं । माझारी वासनेच्या ठायीं । देहाभिमानें पाही संकल्पु भासे ॥ ६० ॥ ” असें म्हणून नाथरायांनीं ह्या विषयाचें पर्यवसान केलें आहे तें याप्रमाणें:- “ ऐसी हे भागवतधर्मस्थिति । शरण जाऊनि सद्‌गुरूप्रती । अभ्यासावी भगवद्भक्ती । तै मायेची शक्ती बाधूं न शके ॥ हरिनामाच्या गजरापुढें । माया पळे लवडसवडें । यालागीं तरणोपावो घडे । सुख सुरवाडे हरिभक्तां ॥ ६१६ ॥ ” देवांनीं गीतेंत तरी ‘ माया दुरत्यय खरी, पण जे मला शरण येतात ते या मायेला तरुन जातात ’ असेंच ( ७–१४ ) म्हटलें आहे. द्रव्यदारादिकांच्या ठिकाणीं आसक्त झालेलें मन तेथून सोडवून तें हरिस्वरूपीं रंगवणें, वासना विषयांपासून सोडवून हरिप्रेमांत विलीन करणें, ‘ मी–मम ’ हें टाकून सर्व हरिच आहे असें अखंड भावून हरिप्रेमांत मीपण विरघळवून टाकणें हाच मायातरणाचा उपाय देवांनीं व संतांनीं सांगितला आहे, तो लक्षांत ठेवून त्याप्रमाणें वागूं लागावें. काळानें नरडी चेंपली आहे, हें जाणून अत्यंत आस्थेनें, उल्हासानें व निश्चयानें हरीकडेच चालूं लागणें हाच मुमुक्षूंचा मुख्य

धर्म आहे. 'मुख्य धर्म देव चित्तीं । आदीं अवसानीं अंतीं ॥' हा हरिस्मरणाचा, हरिचिंतनाचा, आत्मस्थितीचा धर्म. हा मुख्य धर्म आहे हें लक्षांत ठेवून बाकीचे धर्म त्या अनुरोधानें आचरावेत. वर्णाश्रमधर्म मोक्षाप्रत नेणारे असल्यामुळें अवश्य पाळावेत, त्यांचें उल्लंघन करूं नये, त्यांशीं बंडखोरपणानें व दंडेलीनें वागूं नये हें सर्वस्वी खरें आहे; पण त्याहूनही सर्वदा सर्वभावानें सर्वभूतात्मा जो श्रीहरि त्याला पळभरही न सोडतां, त्याच्या चिंतनांत तिळाचाही खंड न पडूं देतां, त्याच्या प्रेमरंगांत आपल्यासकट सर्व विश्वाला रंगवून टाकतां टाकतां मायेच्या पैलाड जाऊन हरिचरणीं कायमचें ठाण मांडून रहावें हा जीवाचा परम धर्म आहे. 'सकळ धर्मांमध्यें धर्म । स्वरूपीं राहणें हा स्वधर्म ।' असें समर्थांनीं म्हटलें आहे. ह्याच अर्थानें देवांनीं 'सर्व धर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज' असें गीतेच्या शेवटीं सांगितलें आहे. येथें सर्वधर्मांचा त्याग कर ह्यावर मुख्य कटाक्ष नसून मला शरण ये यावर मुख्य कटाक्ष आहे. देवाला शरण जाण्यांत सर्व धर्मांचें सार्थक होतें, सर्व धर्मांच्या आचरणाचें फळ मिळतें, सर्व धर्मांचा—त्यांच्या त्यांच्या सफलतेमुळें परित्याग होतो; हा परित्याग तिरस्कारामुळें नव्हे तर सफलतेमुळें होतो. जुन्या चालीच्या एखाद्या कुलीन घराण्यांतल्या कुलवधूला जसा पतिसेवा हा मुख्य धर्म आचरतांना सासूसासरा, दीरजावा, नणंदा इत्यादिकांचा तिरस्कार न करतांहि त्यांच्या सेवेच्या सफलतेमुळें सहज परित्याग होतो; त्याप्रमाणें भक्तालाही हरिशरणागतीच्या मुख्य धर्माचरणांत अन्य धर्मांचा तिरस्कार न करतांही त्यांचा परित्याग होतो. सासूसासरा, दीरजावानणंदा यांची इच्छा तरी वधूनें आपल्या पतीला सर्वभावें अनुसरावें हीच असते. पतिपत्नींचें पूर्ण ऐक्य झालें म्हणजे त्यांना आपल्या सर्व श्रमांची सार्थकता वाटते. सून मुलाला आवडली व त्यांचा एकजीव झाला म्हणजे सुशील सासूला धन्यता वाटते; त्याप्रमाणेंच सर्व वर्णाश्रमधर्म, योग, याग, तप, दान, कर्म, ज्ञान, उपासना इत्यादि सर्व धर्मांनीं जीवाला हरीच्या पदरांत घातलें व हरीनें प्रेमानें त्याचा स्वीकार केला म्हणजे ह्या सर्व धर्मांचा सहज परित्याग होतो. हा परित्याग ह्या धर्मांच्या शुद्ध आचरणाचें फळ असल्यामुळें त्या धर्मांची त्यानें सफलताच

होते. " अहो ! मुलगा व सून एकजीव होऊन प्रेमानें नांदूं लागलीं. आम्हांला त्यांत आनंदच आहे. आतां सुनेनें आम्हांला नाहीं विचारलें तरी आम्हांला कांहीं वाईट वाटत नाहीं हो ! आम्ही काय आतां म्हातारीं झालोंत. आमचें पिकलें पान झालें. तीं दोघें सुखानें नांदोत म्हणजे आम्ही कृतार्थ झालों " असें जशी सासूबाई म्हणते त्याप्रमाणेंच "हा हरीला सर्वभावानें शरण गेला आहे, आतां यानें कर्में टाकलीं, इतर सर्व सोडलें, माझाही परित्याग केला, तरी मलाही आनंदच आहे किंबहुना हीच माझीही इच्छा होती. मी आतां कृतार्थ झालें " असें श्रुतिमाउलीही म्हणते. देवभक्तांचा एकांत हा परमधर्म हें ह्या विवरणाचें तात्पर्य लक्षांत आणून वरील पांचही सूत्रे पहावींत म्हणजे त्यांतील " यो लोकबंधमुन्मूलयति, यो निस्त्रैगुण्यो भवति, यः कर्मफलं त्यजति, कर्माणि संन्यसति, वेदानपि संन्यसति, " इत्यादि त्यागसंन्यासरूपानें केलेल्या निषेधाचें मर्म कळेल. तो संग सोडतो, योगक्षेम सोडतो, ममत्व सोडतो, लोकबंध सोडतो, त्रैगुण्यविषय वेद सोडतो, कर्मफल टाकण्याचा अभ्यास करितां करितां कर्मेंही टाकून देतो. असा हा इतक्यांचा त्याग करणारा पुरुष जोडतो तरी काय ? 'केवलमविच्छिन्नानुराग लभते' अत्यंत शुद्ध, निष्काम व अखंड असें श्रीहरिप्रेम त्याला मिळतें. हा मोबदला केवढा तरी आहे ! हरीसारखें अनर्घ्य रत्न जोडण्यासाठीं त्याला सर्वस्वाचा परित्याग करावा लागतो. मात्र तेवढ्यासाठीं त्याला महानुभाव ह्य. संतसद्गुरु व विविक्तस्थान म्ह. एकांत सेवावे लागतात. सत्संग व एकांत हे हरिप्रेमाचे साधक म्हणून तेवढें तो स्वीकारतो व बाकी सर्वांचा परित्याग करितो. महानुभाव हे हरिप्रेमाचे सागर असतात. हे हरिप्रेमानें निरंतर डोलत असतात. त्यांच्या संगतींत प्रेमाची ओळख होते. सत्सगतींत हरिप्रेमाची ओळख होते व एकांतांत त्याचा अनुभव घ्यावयास सांपडतो. भक्त संग सोडून देवाला सर्वस्वें कसा भजतो व एकांत त्याला किती प्रिय आहे हें ज्ञानोबारायांच्या शब्दांनींच सांगतों. " तरी जो या देहावरी । उदास ऐसियापरी । उखिता ( वाटसरू ) जैसा बिढारीं । बैसला आहे ॥ ५९४ ॥ कां वृक्षाची साउली । वाटे जातां मिनली । घरावरी तेतुली । आस्था नाहीं ॥ ५९५ ॥ साउली सरिसीच असे । परी असे

हें नेणिजे जैसें । स्त्रियेचें तैसें । लोलुप्य नाहीं ॥ ५९६ ॥ जो संपत्तिमाजी असतां । ऐसा गमे पंडुसुता । जैसा कां वाटे जातां । साक्षी ठेविला ॥ ५९८॥ कां तिन्ही काळ होतां । त्रिधा नव्हे सविता । तैसा सुखदुःखीं चित्ता । भेदु नाहीं ॥ ६०२ ॥ आणि मीवांचूनी कांहीं । आणिक गोमटें नाहीं । ऐसा निश्चय तिहीं (काया वाचा मन या तिघांनीं) । जयाचा केला ॥६०३॥ शरीर वाचा मानस । पियालीं कृतानिश्चयाचा कोश (तीर्थ) ॥ एक मी वांचूनी तैसें । न पाहाती आन ॥ ६०५ ॥ मिळोनि मिळताचि असे । समुद्रीं गंगाजळ जैसें । मी होऊनि मज तैसें । सर्वस्वें भजती ॥ ६०८ ॥ आणि तीर्थें धौतें तटें । तपोवनें चोखटें । आवडतीं कपाटें । वसवूं जया ॥६१२॥ शैलकक्षांचीं कुहरें । जळाशयपरिसरें । ....................."

—ज्ञानेश्वरी अ० १३.

———

## ८ पराभक्ति व गौणी भक्ति.



**अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपम् ॥ ५१ ॥**
**मूकास्वादनवत् ॥ ५२ ॥**
**प्रकाश्यते क्वापि पात्रे ॥ ५३ ॥**
**गुणरहितं कामनारहितं प्रतिक्षणवर्धमानम-विच्छिन्नं सूक्ष्मतरमनुभवरूपम् ॥ ५४ ॥**
**तत्प्राप्य तदेवावलोकयति तदेव शृणोति तदेव चिन्तयति ॥ ५५ ॥**
**गौणी त्रिधा गुणभेदादार्तादि भेदाद्वा ॥ ५६ ॥**
**उत्तरस्मादुत्तरस्मात्पूर्वपूर्वा श्रेयाय भवति ॥ ५७ ॥**

**अर्थः**–प्रेमाचें स्वरूप अनिर्वचनीय आहे म्हणजे तें वाचेनें बोलून दाखविण्यासारखें नाहीं. मुक्यानें गोड पदार्थांचा आस्वाद घेतला असतां जसें त्याला बोलून दाखवितां येत नाहीं, तसाच हा प्रकार आहे. एखाद्या ( बहुत सुकृताची जोड पदरीं असलेल्या ) प्रेमळ भक्ताच्या ठिकाणीं असें शुद्ध प्रेम प्रकट दिसतें. तें गुणत्रयाच्या पलीकडचें आहे. कामनेचा विटाळही त्याला खपत नाहीं. क्षणक्षणाला तें वाढणारें पण सतत प्रवाहानें वाहणारें, अत्यंत सूक्ष्म, केवळ अनुभवरूप व अनुभवगम्य असें तें आहे. तें ज्याला मिळालें तो तेंच पाहतो, तेंच ऐकतो, तेंच बोलतो, त्याचेंच चिंतन करितो, त्याला त्या प्रेमावांचून दुसरें कांहीं दिसत नाहीं, ऐकू येत नाहीं, त्यावांचून तो दुसरी कांहीं भाषा काढीत नाहीं व दुसरें कसलेंही चिंतन करीत नाहीं. इतका तो अंतर्बाह्य प्रेममय झालेला असतो. ( हें येथपर्यंत

मुख्य म्ह. पराभक्तीचें वर्णन झालें.) आतां गौणी भक्ति सांगतों, ती गुणभेदावरून अथवा आर्तादि भेदांवरून तीन प्रकारची आहे. पुढच्या पुढच्यापेक्षां मागची मागची भक्ति श्रेष्ठ आहे.

## स्पष्टीकरण.

(५१-५३) प्रेम हें बोलून दाखवितां येत नाहीं. पतिपत्नीसंबंधांतसुद्धां 'हे प्रियकरा ! हे प्राणेश्वरा,' अशी भाषा जोंपर्यंत चालते तोंपर्यंत खरें प्रेम दूरच असतें. प्रिय वस्तूच्या दर्शनाबरोबर, स्पर्शनाबरोबर, प्रेमालिंगनाबरोबर, प्रेमालापश्रवणाबरोबर जो सुखानुभव होतो तो शब्दांनीं सांगतां येणें अशक्य आहे. सांगायचा कोणी प्रयत्न करील तर तें केवळ नाटक होईल. निःशब्दता हेंच प्रेमाचें खरें वर्णन आहे. वेदांनीं 'नेति नेति' म्हणून हात टेकले ते वेद असमर्थ म्हणून नव्हे तर प्रत्यक्षता होण्याचा समय आला तेव्हां सहजच ते स्तब्ध झाले. अनुभवाच्या प्रसंगीं शब्द कुंठित होतो. पाण्याच्या बाहेर डोकें आहे तोंवर शब्द निघतील, पण बुडी मारून तळ गांठल्यावर शब्द तर खुंटतातच पण वरची फुरफुरही बंद होते. 'मौन गा तुझें राशिनाम' ( अ. १७-१५ ) 'स्तुति कांहीं न बोलणें' ( अ. १८-२५ ) इत्यादि प्रकारें ज्ञानोबारायांनीं प्रेमाची अनिर्वचनीयता व्यक्त केली आहे. 'मुक्यानें गूळ खादला। गोडी नये सांगायाला' असा नारदांच्या ५२ व्या सूत्रांतलिच दृष्टांत देऊन समर्थ म्हणतातः--

पदार्थज्ञान जेव्हां सरे। द्रष्टा द्रष्टेपणें नुरे॥
ते समईं उतरे। फुंज मीपणाचा॥ १६॥
जेथें मुरालें मीपण। तेचि अनुभवाची खूण॥
अनिर्वाच्य समाधान। याकारणें बोलिजे॥ १७॥

--दासबोध द. ६ स. १०.

देहाचा पूर्ण विसर पडून द्रष्टयाचें द्रष्टेपण मावळून दृश्यद्रष्टादर्शन ही त्रिपुटी जेथें मावळते तेथेंच अनिर्वाच्य समाधान म्ह० प्रेम असतें. गोपींचें प्रेमही पूर्ण म्हणण्याचें कारण हेंच कीं, त्या देहगेहपतिसुत ह्या सर्वांचें भानही विसरून अंतर्बाह्य कृष्णमय झाल्या होत्या. सीतास्वयंवरप्रसंगीं 'कोण

तुझ्या मनासि येतो सांग वो सीते ' असा प्रश्न करीत सीतेची सखी प्रत्येक राजपुत्र दाखवीत व त्याचें नामगुणकथन करीत चालली तेव्हां ' बाई तो कांहीं नव्हे ' असें सीता म्हणे; पण रामराय दृष्टीस पडल्यावर सीतेची वाचा कुंठित झाली !

' तो ऋषिमंडळिं दिव्य धनुर्धर । तेव्हां न म्हणे नव्हे ग ॥ बाणली निजखूण तन्मय तुझी गे सीते ! ॥ ' —आनदतनय.

अशा प्रकारचें शुद्ध प्रेम एखाद्याच शुद्धचित्त प्रेमळाच्या ठिकाणीं प्रकट दिसतें. बेहोष होऊन प्रेमानंद भोगणारे भक्त अत्यंत विरळ आहेत.

( ५४ ) हें प्रेम—ही पराभक्ति—इतकें निर्मल असतें कीं, सात्विक, राजस व तामस ह्या गुणांचा वाराही तेथें लागत नाहीं. ती सापेक्ष नाहीं, बाह्य लक्षणांनीं अनुमित होणारी नाहीं, कसल्याही सत्—असत् कामनेनें दूषित होणारी नाहीं. ' तेंही नव्हे जें करितां कांहीं । ध्याता ध्यायी तेंही नव्हे ॥ १ ॥ ' कर्म, कर्ता, कार्य किंवा ध्यान, ध्याता, ध्येय इत्यादि सर्व त्रिपुटया तेथें मावळतात. कर्त्यावांचून कर्म, ध्यात्यावांचून ध्यान अशी ती अद्वयानंदाची अनुपम जोड ज्याला होते तो धन्य होय. हेंहि सांगावयाला तो वेगळा उरत नाहीं ! दुसऱ्यांनीं त्याचें वर्णन पाहिजे तर करावें " तरग सर्वांगीं तोय चुंबी, प्रभा सर्वत्र विलसे बिंबीं । नाना अवकाश नभीं । लुंठत जैसा ॥ ११४८ ॥ तैसी क्रिया कीर न साहे । तऱ्ही अद्वैतीं भक्ति आहे । हें अनुभवाचिजोगें नव्हे । बोला ऐसें ॥ ११५१ ॥ " ( ज्ञानेश्वरी अ. १८ ) ज्ञानोबांनीं पुढें म्हटलें आहे, " पै देशें काळें पदार्थें । साधूनि घेइजे मातें । तैसा नव्हे—मी आयते । सर्वांचें सर्वही ॥ १२२४ ॥ " अशी बाहेरून जोडून मिळणारी ही वस्तु नाहीं. ती सहजसिद्ध आहे. परमात्मा प्रेममय असल्यामुळें त्याचा तोच अंगाशीं येऊन खेळूं, डोलूं, नाचूं लागला पाहिजे. इतकें निर्मल प्रेम कामनारहित असतें हें सांगणें नकोच. सकल कामना चित्तांतून निःशेष झडून गेल्याशिवाय हें दिव्यप्रेम चित्तांत उगवावयाचेंच नाहीं. ह्या प्रेमापुढें भक्त त्रैलोक्याचें राज्यही तुच्छ मानितात. ' जे आनंदसमुद्रीं कुंभ । चुबकळोनि भरले ' असे भक्त प्रत्यक्ष कैवल्यालाही मान देत नाहींत. हें प्रेम एकदा चित्तांत घुसूं लागले, कीं

वर्षाकालच्या नदीप्रमाणें तें क्षणोक्षणीं वाढत असतें. तुकोबांनीं म्हटल्याप्रमाणें "नित्य नवा कीर्तनीं कैसा ओढवला रंग। श्रोता आणि वक्ता स्वयें जाला पांडुरंग ॥" असा तो प्रेमरस वाढतच जातो व अखेर 'अवघें जगचि महासुखें। दुमदुमित भरलें।' असें होऊन जातें. तो प्रेमाचा प्रवाह अविच्छिन्न चालतो. त्याला चढउतार, भरतीओहटी नसते. आज आहे आणि उद्यां नाहीं, असें तें जाणारें प्रेम नाहीं, तें अखंड असतें. एवढें तें महासुख पण सूक्ष्मतर आहे. 'यो बुद्धेः परतस्तु सः' इतकें तें सूक्ष्म आहे. सूक्ष्म प्रकृतिही ज्याच्या दृष्टीनें स्थूल आहे इतकें तें सूक्ष्म आहे, तथापि त्याचा प्रताप मोठा आहे. तें केवळ अनुभवरूप आहे.

(५५) असें तें अनुपम प्रेम ज्याला प्राप्त झालें आहे तो त्याचेच वारंवार घुटके घेत असतो, तेंच ऐकतो, तेंच बोलतो, त्याच्याच चिंतनांत तल्लीन होऊन डोलत असतो. त्या प्रेमानुभवांत तो रंगून गेला म्हणजे त्याला देहभान नसतें. प्रेमवृद्धीबरोबर देहभान सुटत जातें. 'काय खातों आम्ही काशाचे सांगातें' हें त्याला कळत नाहीं, सर्व नादांत प्रेममूर्ति हरिच त्याचा सांगाती असतो. "बोलावा विठ्ठल पाहावा विठ्ठल। करावा विठ्ठल जीवभाव ॥" असा त्या प्रेमामृततृप्तीचा मग जगालाही उपदेश व लाभ होत असतो. संजयाला श्रीकृष्णाचें तें मनोहर रूप व तो श्रीकृष्णार्जुनसंवाद वारंवार आठवून आनंदाच्या गुदगुल्या कशा होत होत्या हें पुढील श्लोकांवरून स्पष्टच आहे. "राजन् संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्‌भुतम्। केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ७६ ॥ तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्‌भुतं हरेः। विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ॥ ७७ ॥" (गीत अ. १८). हरिप्रेम एकदां प्राप्त झाल्यावर पुनः तें कोण सोडील? त्याच्या स्मरणानेंहि तो आनंद वाढत असतो. येथपर्यंत पराभक्तीचें वर्णन झालें. आतां गौणी भक्तीकडे वळूं.

(५६–५७) गौणी भक्ति त्रिविध आहे. सात्विक, राजस व तामस या गुणांमुळें तीन प्रकारची झालेली किंवा आर्त, जिज्ञासु व अर्थार्थी याप्रमाणें त्रिप्रकारक झालेली. या नारदांच्या सूत्रांत 'आर्तादिभेदाद्वा' म्हणून म्हटलें आहे, त्याचा अंमळ स्वतंत्रपणानें येथें विचार करूं. ह्या

सूत्रावरून नारदांनीं भगवद्गीतेचा या प्रसंगीं विचार मनांत आणला असा-वा असें वाटतें. अर्थात् गीता नारदांच्या सूत्रापूर्वीची ठरते. म्हणून आपण प्रथम भगवद्गीतेकडे वळूं.

श्रीभगवद्गीतेच्या सातव्या अध्यायांत भगवंतांनीं भक्तांचे चार प्रकार सांगितले आहेत. आर्तभक्त, जिज्ञासुभक्त, अर्थार्थीभक्त व ज्ञानीभक्त. हे सर्व भक्त 'सुकृती' आहेत. तथापि त्यांतही 'नित्ययुक्त आणि एकभक्ति' असा ज्ञानीभक्त श्रेष्ठ आहे, किंबहुना 'ज्ञानी त्वात्मैव मे मतम्' ह्मणजे ज्ञानीभक्त साक्षात् माझा आत्मा आहे असें भगवंतानीं सांगितलें आहे. आतां आर्त, जिज्ञासु व अर्थार्थी ह्या तीन पदांच्या अर्थाबद्दल बराच मत-भेद आहे, त्याचा विचार करूं.

**आचार्यांनीं** आपल्या गीताभाष्यांत चतुर्विध भक्तांचें लक्षण केलें आहे तें असें—

( क ) **आर्तः**—तस्करव्याघ्ररोगादिनाऽभिभूतः आपन्नः

( ख ) **जिज्ञासुः**—भगवत्तत्वं ज्ञातुमिच्छुः

( ग ) **अर्थार्थीः**—धनकामः

( घ ) **ज्ञानीः**—विष्णोस्तत्वविद्.

म्हणजे संकटांनीं किंवा रोगांनीं जर्जर झालेला व आपत्तींत सांपडलेला तो आर्त, भगवत्तत्व जाणूं इच्छिणारा तो जिज्ञासु, धनाची कामना ठेव-णारा तो अर्थार्थी व विश्वव्यापक परमात्म्याचें तत्व जाणणारा तो ज्ञानी असे या पदांचे अर्थ श्रीमदाचार्यांनीं केले आहेत.

ह्यांत मुख्य प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, आर्तापासून ज्ञान्यापर्यंत जे चार भक्त सांगितले, त्यांत कांहीं क्रम आहे किंवा नाहीं ? आर्तापेक्षां जि-ज्ञासु वरच्या पायरीचा, अर्थार्थी त्याहून वरचा व ज्ञानी सर्वांत वरचा असा यांत कांहीं चढता क्रम आहे कां उगीच जसे सुचले तसे देव बोलत गेले? क्रम आहे असें म्हटल्यास आचार्यांनीं दिलेल्या अर्थानें मनाचें नीट समा-धान होत नाहीं. ज्ञानी सर्वश्रेष्ठ असे सर्वसंमत असल्यामुळें आपण पहिल्या तिघांचाच विचार करूं. देवांच्या बोलण्याला वैगुण्य येऊं नये व क्रम तर आहे असें ठरावें असें असेल तर वरील पदांचा अर्थ आचार्यांनीं केलेल्या अर्थाहून थोडासा निराळा केला पाहिजे. अर्थार्थी याचा अर्थ धनकामी

असा केल्यास त्याची योग्यता पहिल्या दोन भक्तांपेक्षां अधिक मानावी लागते व तसें करणें कोणासही संमत नाहीं. अर्थार्थी हा भक्तकोटींतच येऊं शकणार नाहीं व कदाचित्–अर्थासाठीं कां होईना, पांच रुपये बढती होण्यासाठीं सत्यनारायण करितो आहेना, घ्या त्याला भक्तकोटींत मिळवून–असा विचार मनांत आणला तरी असा भक्त कनिष्ठच गणला पाहिजे. तो आर्तापेक्षां व जिज्ञासूपेक्षां वरचढ मानतां येणार नाहीं! तात्पर्य, आचार्यांचा वरील तीन पदांचा अर्थ घेतला तर क्रम नीट बसत नाहीं व पदांत क्रम नसेल असेंही वाटत नाहीं; तर आतां वरील तीन पदांचे कोणते अर्थ–संतसंमत अर्थ–घेतले असतां क्रम बरोबर लागून देवांच्या बोलण्याचें मर्म मनावर ठसेल याचा थोडासा विचार करूं.

नारदांच्या सूत्रांचा विचार केला म्हणजे आर्त, जिज्ञासु व अर्थार्थी यांत कांहीं क्रम लावणें नारदमहर्षींना अवश्य वाटलें व तो त्यांनीं १ अर्थार्थी २ जिज्ञासु व ३ आर्त असा लावला हें स्पष्ट दिसतें. वरील सूत्रांचा अर्थ असा आहे. "गौणी भक्ति तीन प्रकारची आहे. मग तुम्ही सात्विक भक्त, राजस भक्त व तामस भक्त अशा प्रकारें समजा किंवा आर्त, जिज्ञासु व अर्थार्थी अशा प्रकारें समजा, एवढें मात्र आहे कीं, पुढच्या पुढच्या भक्तापेक्षां मागचा मागचा भक्त श्रेष्ठ होय, किंवा त्याची भक्ति श्रेयस्कर होय." म्हणजे अर्थार्थी भक्तापेक्षां जिज्ञासु भक्त श्रेष्ठ व त्यापेक्षां आर्त भक्त श्रेष्ठ होय. नारदांनीं चतुर्विध भक्तांतल्या पहिल्या तीन भक्तांचा उलट क्रम लावला आहे व 'ज्ञानी त्वात्मैव मे मतम्' या भगवदुक्तीप्रमाणें ज्ञानी भक्त साक्षात् हरिरूपच होय (तस्मिंस्तज्जने भेदाभावात् सूत्र ४१) असें सांगितलें आहे. असें करतांना अर्थातच नारदांनीं आचार्यांनीं दिलेलेच वरील पदांचे अर्थ घेतले आहेत. असो, चतुर्विध भक्तांचा क्रम गीतेंत दिलेला आहे तसाच घेऊन त्या पदांचा अर्थ लावण्याचा प्रयत्न मात्र येथपर्यंत झाला नाहीं; तो ज्ञानेश्वरींत प्रथम झाला व त्याचें खरोखर उत्कृष्ट विवरण नाथांनीं पुढें भागवतांत केलें!

ज्ञानेश्वरमहाराजांनीं म्हटलें आहे:—

> ह्मणोनि ते मातें चुकले । एथ चतुर्विध मज भजले ॥
> जिहीं आत्महित केलें । वाढतें गा ॥ १०८ ॥
> तो पहिला आर्त ह्मणिजे । दुसरा जिज्ञासु बोलिजे ॥
> तिजा अर्थार्थी जाणिजे । ज्ञानिया चौथा ॥ १०९ ॥
> तेथ आर्त तो आर्तीचेनि व्याजें । जिज्ञासु तो जाणावयालागीं भजे ॥
> तिजेनि तेणें इच्छिजे । अर्थसिद्धि ॥ ११० ॥
> मग चौथियाच्या ठायीं । कांहींच करणें नाहीं ॥
> ह्मणोनि भक्त एक पाहीं । ज्ञानिया जो ॥ १११ ॥

ह्या ओव्यांत आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी हे **'वाढतें आत्महित'** करणारे आहेत असें सांगून ज्ञानेश्वरमहाराजांनीं त्यांचा उत्तरोत्तर श्रेष्ठत्वाचा क्रम स्पष्ट सुचविला आहे. तथापि पहिल्या तीन पदांचा खुलासा येथें केलेला नाहीं. तो खुलासा त्यांनीं पुढें १८ व्या अध्यायांतील ५४ व्या श्लोकावरील 'मद्भक्तिं लभते पराम्' ह्या पादाच्या अर्थात चांगला केला आहे. तथापि त्यांचें उत्तम स्पष्टीकरण नाथमहाराजांनीं[1] आपल्या भागवतांत सहज ओघानें फार फार बहारीनें केलें आहे.

नाथांनीं भागवताच्या १९ व्या अध्यायांतील २४ व्या श्लोकावर टीका करतांना सहज 'मयि संजायते भक्तिः कोन्योऽर्थोऽस्यावशिष्यते' यावर लिहितांना आर्त, जिज्ञासु व अर्थार्थी यांचे लौकिक व पारमार्थिक असे दुहेरी अर्थ देऊन भक्तीविषयीं बोलतांना पारमार्थिक अर्थच कां घेतले पाहिजेत व यांचे परस्परसंबंधही कसे आहेत तें फार बहारीनें कथन केलें आहे. प्रथम नाथांच्या ओंव्याच पहाः—

---

१ टीपः—आचार्य, नारद व नाथ हे सर्वच महात्मे आम्हांस परमपूज्य व परमप्रिय आहेत. त्यांनीं केलेल्या अर्थातल्या फरकांवरून कोणाविषयीं आमचा अत्यल्पही अनादर आहे असें कोणीं समजूं नये. उलट पुढचे महात्मे मागच्या मागच्या महात्म्यांच्या कृपेनें समर्थ झालेले असल्यामुळें ते आपल्या पूर्वज महात्म्यांचा मनोभाव अधिक विशद करितात असेंच आम्ही समजतों.

निःशेष मावळल्या अहंकृती । भूतें निजात्मरूप दिसती ॥
माझ्या स्वरूपाची सहजस्थिती । ते माझी मुख्य भक्ती उद्धवा ॥२६९॥
ये भक्तीच्या लेशस्थितीं । आर्त जिज्ञासु अर्थार्थी ॥
प्रकाशले गा वर्तती । निजस्वार्थी साधक ॥ २७० ॥
रोगिया नांव आर्तता । हें व्याख्यान नव्हे परमार्था ॥
भगवत्प्राप्तीची चित्तीं व्यथा । ते आर्तता परमार्थी ॥ २७१ ॥
जो भगवंताचे प्राप्तीलागीं । कडा घालूं धांवे वेगीं ॥
कां रिघो पाहे जळते आगीं । तो आर्त सवेगीं बोलिजे ॥२७२॥
आर्ताची स्थिति ऐसी । जिज्ञासु वारी त्यासी ॥
मनुष्यदेह ब्रह्मप्राप्तीसी । तो आत्महत्येसी नको योजूं ॥ २७३ ॥
मागील भक्त कोणे रीती । जाणोनि पावले भगवद्भक्ती ॥
जीवें भावें त्या विवरी युक्ती । जिज्ञासु निश्चिती या नांव ॥ २७४ ॥
मज जाणावयाची ऐसी जे आशा । तीतें म्हणती शुद्ध जिज्ञासा ॥
तेही प्रकाशक माझ्या प्रकाशा । मी जिज्ञासु ऐसा तेणें जाणें ॥२७५॥
ब्रह्मप्रापका युक्तीचा ठसा । या नांव शुद्ध जिज्ञासा ॥
वेदशास्त्रजाणीववळसा । लौकिकजिज्ञासा त्या नांव ॥ २७६ ॥
सर्वा अर्थी मीचि अर्थना । शुद्ध अर्थार्थी या नांव जाणा ॥
म्हणती अर्थार्थी द्रव्यकामना । ते मंद व्याख्याना प्रवर्तती ॥२७७॥
दृष्टी पडे नाना अर्थीं । जो विवंचोनि लावी परमार्थीं ॥
त्या नांव बोलिजे अर्थार्थी । त्यातेंही निजभक्ती प्रकाशे माझी ॥२७८॥
एवं आर्त जिज्ञासु अर्थार्थी । त्यांतें प्रकाशे माझी सहजभक्ती ॥
तीतें भक्त चतुर्धा मानिती । अधिकारस्थितिविभागें ॥ २७९ ॥

ह्या ओंव्यांचें नीट मनन करावे. आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी हे 'वाढतें आत्महित' करणारे आहेत असें ज्ञानोबाराय सांगतात व 'अधिकार स्थितिविभागें' भक्त चतुर्धा मानले जातात असेंच नाथ सांगतात. दोघांचा भाव एकच. ज्ञानी भक्त हरिरूपच आहे. पण त्याच्या पूर्णभक्तीच्या लेश-स्थितीनें बाकीचे तीन भक्त होतात.

नाथ आर्त, जिज्ञासु व अर्थार्थी यांचे **लौकिक** व **पारमार्थिक** असे दोन अर्थ करून येथें पारमार्थिक अर्थच घेतले पाहिजेत असें सांगतातः--

( १ ) लौकिक **आर्त**-रोगी; पारमार्थिक आर्त-भगवत्प्राप्तीची व्यथा लागलेला.

( २ ) लौकिक **जिज्ञासु**-वेदशास्त्रजाणीववळसा घेणारे; पारमार्थिक-जिज्ञासु-भगवंतालाच जाणावयाची खटपट करणारे ( तैसा प्रतिपाद्य जो ईश्वर। तो होवयालागी गोचर। श्रुतींचा निरंतर। अभ्यास करणें ॥ ज्ञानेश्वरी १६.१०३ )

( ३ ) लौकिक **अर्थार्थी**-धनकामी; पारमार्थिक अर्थार्थी-सर्वार्थांत भगवंतच लोभनीय होत असा ज्याचा दृढ भाव तो.

या अर्थानें पाहतां चतुर्विध भक्त क्रमाक्रमानें श्रेष्ठ कसे आहेत तें चांगलें समजतें. आर्ताला भगवत्प्राप्तीची व्यथा लागलेली असते. ती व्यथा लागल्यावर वेदशास्त्रपुराणसंत यांच्याठायीं नम्र होऊन केवळ भगवंतालाच शोधूं लागतो तो जिज्ञासु. भगवंतावांचून बाकी सगळे अर्थ अनर्थ आहेत व भगवंतच सेव्य आहेत असें दृढ भावून अनेकार्थी भगवंत पाहूं लागतो तो अर्थार्थी; सर्व हरिमय आहे अशा निश्चयावर आरूढ होऊन तन्मय झालेला तो ज्ञानी. हे ज्ञानी, भक्त आणि हरि हे एकच होत.

---

# ९ भक्तीची सुलभता.

**अन्यस्मात् सौलभ्यं भक्तौ ॥ ५८ ॥**
**प्रमाणान्तरस्यानपेक्षत्वात् स्वयंप्रमाणत्वात् ॥ ५९ ॥**
**शांतिरूपात्परमानंदरूपाच्च ॥ ६० ॥**

### अर्थ.

दुसऱ्या कोणत्याही मार्गापेक्षां भक्तिमार्ग हाच सुलभ आहे; कारण हा स्वयंप्रमाण आहे, याला बाहेरचें प्रमाण नको आहे. हा शांतिरूप व परमानंदरूप आहे.

### स्पष्टीकरण.

( ५८–६० ) भक्तिमार्ग हा कर्मज्ञानयोगांपेक्षां श्रेष्ठ आहे असें मागें ( सूत्रें २५–२७ ) सिद्ध केलेंच आहे. आतां तो त्याहून सुलभ आहे असें सांगतात. भक्ताला घरदार, धनदौलत मिळवावी लागत नाहीं, व असली तरी टाकावी लागत नाहीं. कोणत्याही अवस्थेंतल्या, आश्रमांतल्या व जातींतल्या पुरुषाला, स्त्रीला अगर मुलाला भक्त होतां येतें; मात्र हरीविषयीं शुद्ध प्रेम पाहिजे. त्याला उपचार नकोत. त्याला कसलीही आडकाठी नाहीं. योगाला शरीरबळ व ज्ञानाला बुद्धिबळ पाहिजे. भक्तीला कांहीं सांडावें लागत नाहीं व कांहीं मांडावें लागत नाहीं. 'असाल ते असा जेथें तेथें,' मात्र हरीचे होऊन जा. आतां ह्या भक्तिसुखाला बाहेरचें प्रमाण कां नको तें उघडच आहे, भ्रताराच्या अंगसंगानें भार्येला जें सुख होतें तें भार्या होऊनच भोगलें पाहिजे, कुमारिकेला तें सांगूनही समजावयाचें नाहीं; तसेंच भक्तिसुख भक्त होऊन भोगावें, तें सांगून बहिर्मुखाला समजावयाचें नाहीं. हरिव्यतिरिक्त सर्व कामनांचा त्याग करून हरीशीं तन्मय होऊन तें सुख भोगावें म्हणजे तें शांतिरूप व परमानंदरूप कसें आहे तें समजेल. याचें विवरण मागें झालें आहेच.

---

# १० साधकानें काय सोडावें ?

——:❀०❀:——

**लोकहानौ चिंता न कार्या निवेदितात्मलोकवेदत्वात्॥६१॥**

**न तदासिद्धौ लोकव्यवहारो हेयः किंतु फलत्यागस्तत्साधनं च कार्यमेव ॥ ६२ ॥**

**स्त्रीधननास्तिकचरित्रं न श्रवणीयम् ॥ ६३ ॥**

**अभिमानदंभादिकं त्याज्यम् ॥ ६४ ॥**

**तदर्पिताखिलाचारःसन् कामक्रोधाभिमानादिकं तस्मिन्नेव करणीयम् ॥ ६५ ॥**

## अर्थ.

शान्तिरूप भक्तिप्रेमाचा अनुभव घेत असणाऱ्या भक्ताचे लोकव्यवहार बिनबोभाट होत नसले तरी त्यानें चिंता करूं नये, ह्म० लौकिक कर्में नीट होत नसल्याबद्दल त्यानें खंती बाळगूं नये; कारण त्यानें आपलीं लौकिक, वैदिक वगैरे सर्व प्रकारचीं कर्में भगवंताला समर्पण केलेलीं असतात. भक्तीची स्थिति अंगीं बाणली नाहीं तोंवर लोकव्यवहार टाकूं नये, मात्र लौकिक कर्मेंही कांहीं फलहेतु मनांत धरून करूं नयेत आणि भक्ति सिद्ध होण्याचें साधन मात्र करीत असावें. स्त्रियांच्या, पैशाच्या व नास्तिकांच्या गोष्टी कदापि ऐकूं नयेत; अभिमान आणि दंभ यांचा सर्वथा त्याग करावा; सर्व कर्म भगवंताला अर्पण करून काम, क्रोध, अभिमान इत्यादि वृत्ति चित्तांत उद्भवल्या तरी त्याही देवाकडेच लावाव्यात म्ह० काम देवाचाच धरावा, क्रोध त्याच्यावरच करावा व अभिमानही त्याचाच व्हावा.

## स्पष्टीकरण.

( ६१–६२ ) भक्तांचीं लौकिक, वैदिक आंतर्बाह्य सर्वच कर्में भगवंताला अर्पण होत असल्यामुळें व वैदिक कर्में तो यथाशास्त्र आचरीत अस-

त्यामुळें लौकिक कर्में त्याच्या हातून नीट न उरकणें साहजिक आहे. पण याबद्दल त्यानें खंती बाळगण्याचें कारण नाहीं. लोक भले म्हणतील कां वाईट म्हणतील याचा त्यानें फारसा विचार करूं नये. लोक कधीं उगाच डोक्यावर घेऊन नाचतील व कधीं निष्कारण छळ मांडतील. लोकांचीं मनें सांभाळण्याचें काम फार बिकट आहे. लोक आज एखाद्याला एखाद्या कामाबद्दल चांगलें म्हणतील तर उद्यां त्याला त्याच कामाबद्दल वाईटही म्हणतील. ज्याला आपलें उद्दिष्ट साधावयाचें आहे त्यानें लोकमताची खुषामतही करूं नये व त्याला डिवचूंही नये. "वानोत निंदोत" असें साधकानें लोकमताविषयीं उदासीन असावें. लौकिक राखणें कठिण आहे. 'ऐसा हा लौकिक कदा राखवेना' ह्या अभंगांत तुकोबांनीं म्हटलें आहे कीं, लोक हे मृदंगासारखे दोहींकडून थापा मारायला तयार असतात. संसार करावा तर पातकी व टाकावा तर पोटपोशा म्हणतात; आचारवंताला हा दांभिक आहे असें म्हणतात व आचारहीनाला भ्रष्ट म्हणून निंदितात; सत्संग करणाऱ्याला हा गुरूचा उपदेशी म्हणून हिणवतात, न करणाऱ्याला अभागी अज्ञान म्हणतात; निर्धनाला करंटा व धनिकाला उन्मत्त म्हणतात; बोलक्याला वाचाळ व मौन धरणाऱ्याला गर्विष्ठ म्हणतात; लग्न केलें तर हा माजला आहे ह्मणतात व न करणाराला नपुंसक ठरवितात; निपुत्रिकाला चांडाळ म्हणतात व अपत्यवंताला पोरवड्यांचा बाप म्हणतात!! हीं उदाहरणें देऊन तुकोबा सांगतात कीं 'ओक तैसा लोक धरितां धरवेना!' असा हा लौकिक आहे म्हणून करा काय?—

तुका म्हणे आतां ऐकावें वचन। त्यजुनियां जन भक्ति करा ॥ ११ ॥

'त्यजुनियां जन भक्ति करा' याचाच अर्थ नारदांच्या 'लोकहानौ चिंता न कार्या—तत्साधनं॰च कार्यमेव' ह्या उक्तींत आहे. लोकांकडून बरें म्हणून घेण्याची हांव न बाळगतां देवाला प्रिय होण्याचा उपाय करा. लौकिक सुटो पण देव गांठो. सर्व लोकांना एकदम संतुष्ट करण्याचा उपाय आजवर कोणालाच सांपडला नाहीं. याच अर्थाचें एक मजेचें संस्कृत सुभाषित आहेः—

सर्वथा स्वहितमाचरणीयं किं करिष्यति जनो बहुजल्पः।<br>
नास्ति तत्र खलु कश्चिदुपायः सर्वलोकपरितोषकरो यः ॥

हेंच तुकोबांनीं अभंगांत सांगितलें आहेः—

सत्यअसत्यासी मन केलें ग्वाही । मानियेलें नाहीं बहुमता ॥ १ ॥

लौकिकाची खरी किंमत जाणावी, तथापि प्रेमसुख पूर्णपणें बाणलें नाहीं तोंवर 'मार्गाधारें वर्तावें' हेंच योग्य आहे. लोकव्यवहार टाकूं नये व तो करीत असतां कांहीं तत्संबंधीं हेतू पोटांत ठेवूं नये. मुलाला चांगलें वळण लागावें, त्याला शिक्षण मिळावें व तो योग्य मार्गाला लागावा म्हणून बापानें आपलें कर्तव्य उत्तम रीतीनें बजवावें, पण हा मुलगा पुढें माझ्या उपयोगी पडेल इ० हेतु मनांत बाळगूं नयेत. लौकिककर्महीं फलहेतूची आकांक्षा मनांत न ठेवतां करावें व मुख्यत्वें साधायचें ते हरिचरण साधावे. तात्पर्य, लौकिककर्मैं हीं फलहेतु सोडून करावींत व चित्त हरीचे पायीं ठेवून त्याचें साधन करीत असावें.

(६३) भक्तीचें साधन करीत असतांना भक्तीला विरोधी जे प्रकार आहेत ते टाळावेत असें पुढील दोन सूत्रांत सांगितलें आहे. प्रथमतः स्त्री, धन व नास्तिक यांच्या गोष्टी ऐकूं नयेत, यांचीं चरित्रें पाहूं नयेत. स्त्रीचरित्रें पाहिल्यानें मन कामाकार होतें, धनाच्या व धनिकांच्या गोष्टि ऐकल्यानें लोभवृत्ति बळावते व नास्तिकांच्या गोष्टी ऐकल्यानें असलेला विश्वासही डळमळूं लागतो. ह्मणून साधकानें स्त्रीधननास्तिकांच्या गोष्टी ऐकूं नयेत. प्रथम विषय स्त्री हा तर साधकाच्या वाटेंतला मोठाच खळगा आहे, ह्मणून 'एकांतीं लोकांतीं स्त्रियांशीं भाषण । प्राण गेल्या जाण करूं नये ॥' असा तुकोबांनीं साधकांस इषारा देऊन ठेवला आहे. नाथांनीं 'चिरंजीव' पदांत विरक्त कसा असतो हें सांगतांना म्हटलें आहे:—

नावडे स्त्रिया पाहणें । नावडे स्त्रियांत बैसणें ।
नावडे स्त्रियांचें रगडणें । त्यांचें स्पर्शणें नावडे ॥ ३० ॥

जो विवाहित असेल त्यानें 'स्वस्त्रीवांचोनी नातळावी अन्य कामिनी' हें उघडच आहे पण:—

स्वस्त्रीसीही कार्यापुरतें । बोलावें स्पर्शावें निरुतें ॥
परी आसक्ती धरूनि तेथें । सर्वथा चित्तें न गुंफावें ॥ ३२ ॥

स्त्री हा विषयच असा आहे कीं, जेथें पुरुषानें हटकून लुटपुटावें ह्मणून ह्याविषयीं साधकानें अत्यंत सावध असलें पाहिजे. नाटककादंबऱ्यादि ज्या

ज्या ग्रंथांत फाजील प्रणयकथा वर्णिल्या असतील त्या वाचूं नयेत, नाटकें तमाशे पाहूं नयेत, व स्त्रियांचे कथालाप जेथें चालत असतील त्या त्या स्थळा-पासून व माणसांपासून दूर असावें. स्त्रीस्त्रैणांचा संग करूं नये, त्याचप्रमाणें नास्तिकांचाही संग करूं नये. ईश्वरावर व शास्त्रांवर ज्याचा विश्वास नाहीं तो नास्तिक होय. 'यांत काय अर्थ, त्यांत काय अर्थ' असलीं तर्कटें रचून नास्तिक हा समाजाचा पायाच ढांसळून टाकूं पाहतो. * नास्तिकांइतका समाजाचा दुसरा कोणीही शत्रु नाहीं. 'देह तोचि देव भोजन ते भक्ति। मरण ते मुक्ति पाखंड्याची ॥' याप्रमाणें तुकोबांनीं एका अभंगचरणांत नास्तिकांचें वर्णन केलें आहे. अशांचा संग तर नसावाच पण अशांशीं भाषणप्रसंगसुद्धां करूं नये, देवांनीं ज्ञानोबारायांच्या मुखानें स्पष्ट सांगितलें आहे कीं, "तैसे जे पार्था। विमुख या परमार्था। तयांसी भाषण सर्वथा। करावें ना ॥" असो, तर काम, लोभ व अविश्वास यांना उत्तेजित करणारे जे स्त्री, धन व धनिक आणि नास्तिक यांच्या गोष्टी ऐकूं नयेत. भक्तीचा विडा ज्यानें उचलला त्यानें पथ्य संभाळलें पाहिजे. धनाच्या गोष्टी ऐकून आपल्या स्थितीचा असंतोष वाटून आहे यापेक्षां अधिक धन असावें असें वाटतें, ह्मणून त्या ऐकूं नयेत. परमार्थांत नजर वर व प्रपंचांत नजर खालीं असावी.

(६४) अभिमान, दंभ इत्यादि आसुरी संपत्तीचे सर्व गुण म्हणजे दुर्गुण टाकावेत. आपण कोणी मोठे आहोंत ही बुद्धि ह्मणजे अभिमान व आपला मोठेपणा चव्हाट्यावर मांडण्याची वेडी हांव हा दंभ होय. संपत्तीचा, संततीचा, बळाचा, बुद्धीचा, कौशल्याचा, ज्ञानाचा, सदाचाराचा कोणत्याच प्रकारचा अभिमान नसावा. कांहीं गुण जवळ असले तरी सुद्धां हें ईश्वराचें देणें आहे म्हणून त्याला अनन्य असावें. निरभिमानपणाचा सुद्धां अभिमान मारक होतो!

---

* १ प्रसिद्ध इंग्रज तत्त्ववेत्ता एडमंड बर्क यानें एके ठिकाणीं ह्मटलें आहे कीं, "समाजाला अत्यंत भयप्रद व निष्ठुर धक्का कोणापासून बसत असेल तर तो नास्तिकांपासूनच होय. नास्तिक लोक समाजांतून बहिष्कृत केलेले पुरुष होत व ते अमक्या एका देशाचे किंवा समाजाचे शत्रु आहेत असें नसून सर्व मनुष्यजातीचे शत्रु आहेत."

'तुका म्हणे नरकीं घाली अभिमान' असा अभिमानानें अधःपात होतो. रावण, शिशुपाल, हिरण्यकशिपु हे सारे अभिमानानें मेले. 'गर्वाचें घर खालीं' ही म्हण प्रसिद्धच आहे. मोठे मोठे गेले, ही बहुरत्ना वसुंधरा आहे, मी कोण्या झाडाचा पाला आहे असें मनांत आणीत जावें. अभिमान मारायचा उत्तम उपाय नमनभक्ति हा आहे. 'नमन ते भक्ती' असें तुकोबांनीं याच अर्थानें भक्तीचें लक्षण केलें आहे. भूतमात्र नमावे. लोटांगण घालायला, वांकायला, पायां पडायला शिकावें. ही केवळ शारीरिक क्रिया म्हणून न करतां भूतमात्रीं हरिच पाहण्याचा अभ्यास ठेवावा म्हणजे अभिमान आस्ते आस्ते चित्तांतून ठाणें उठवील. दंभ तर त्याहूनही घातक आहे. आपण आहोंत त्याहून मोठे दिसण्याची व आपले गुण चव्हाठयावर मांडून लोकांकडून 'वाहवा' म्हणून घेण्याची जी हांव तो दंभ होय. "म्हणोनि वाचेच्या चौबारां। घातलिया धर्माचा पसारा। धर्मचि तो अधर्म होय वीरा। तो दंभ जाणे ॥ (ज्ञानेश्वरी १६–२२३). शेतकरी पेरणी करून वर माती घालतो किंवा कुलवधू आपले अवयव लपविते, त्याप्रमाणें आपुला धर्म लपविण्याची बुद्धि ठेवावी. पुण्यकर्माला बाहेरची लोकप्रशंसेची हवा लागली कीं, किडे पडलेच म्हणून समजावें. धर्मकर्माच्या बाटलीचें बूच काढूंच नये, कां कीं बाहेरच्या हवेनें तें नासून जातें. सत्कर्म, सद्बुद्धि, सदाचार हे बाहेर लोकांना दिसून त्याचेकडून प्रशंसा व्हावी अशी तिळभर बुद्धि पोटांत न ठेवतां या सर्वांनीं परमेश्वराला प्रसन्न करण्यास झटावें. लोकांनीं मान डोलावून काय उपयोग? आपलें सत्कर्म ईश्वराला पसंत पडलें तरच जगण्याचें सार्थक. देवाच्या घरीं मान व्हावा, देवाचा प्रसाद जोडावा, देवानें पदरांत घ्यावें अशाच सुबुद्धीनें सत्कर्म आचरीत असावें.

(६५) सर्व कर्में देवाला अर्पण करावीत व कामक्रोध, व अभिमान हे जर नष्ट झाले नाहींत तर देवालाच वहावेत. 'कामक्रोध आम्हीं वाहिले विठ्ठलीं' असें तुकोबा म्हणतात. कामक्रोधाभिमान जावेत हें उत्तम, पण हे न जातां जरी चित्तांत राहिले तरी त्यांची मोहर हरीकडे फिरवावी म्हणजे त्यांच्यांतलें विष नाहींसें होऊन ते क्रमानें जातातच. सर्वेंद्रियांना हरीचेंच

वेड लावावें म्हणजे चित्तांतले विकारही हरिरूप होऊन जातात. " मग मीचि डोळां देखिला। जिहीं कानीं मीचि ऐकिला। मीचि मनीं भाविला! वानिला वाचा ॥३५९॥ सर्वांगीं सर्वांठायीं मीचि नमस्कारिला जिहीं। दान पुण्यादिकें जें कांहीं। तें माझियाचि मोहरा ॥३६०॥ जे अहंकार वाहत अंगीं। आम्ही हरीचे भूषावयालागीं। जे लोभिये एकचि जगीं। माझेनि लोभें ॥ ३६२ ॥ जे माझेनि कामें सकाम। जे माझेनि प्रेमें सप्रेम। जे माझिया भुलीं सभ्रम। नेणती लोक ॥ ३६३ ॥ जयांची जाणती मजचि शास्त्रें। मी जोडे जयांचेनि मंत्रें। ऐसे जे चेष्टामात्रें। भजले मज" ॥ ३६४ ॥ ( ज्ञानेश्वरी अ० ९ ) याप्रमाणें कामक्रोधाभिमानादि सर्वच वृत्ति देवाला वहाव्यात. काम तरी देवाचाच धरावा, राग आला तर त्याच्यावरच रागवावें व अभिमान तरी त्याचाच धरावा म्हणजे ह्या वृत्ति मूळच्या ओंवळ्या असल्या तरी गोपींप्रमाणें परमात्मसंगतीनें पावन होऊन त्याच्याच स्वरूपांत विश्राम पावतील.

———

## ११ भक्तगौरव.

त्रिरूपभंगपूर्वकं नित्यदास्यनित्यकांता-
भजनात्मकं प्रेम कार्यं प्रेमैव कार्यम् ॥ ६६ ॥
भक्ता एकान्तिनो मुख्याः ॥ ६७॥
कंठावरोधरोमांचाश्रुभिः परस्परं लपमानाः
पावयंति कुलानि पृथिवीं च ॥ ६८ ॥
तीर्थीकुर्वन्ति तीर्थानि सुकर्मीकुर्वन्ति
कर्माणि सच्छास्त्रीकुर्वन्ति शास्त्राणि ॥ ६९॥
यतस्तन्मयाः ॥ ७० ॥
मोदन्ते पितरो नृत्यन्ति देवताः
सनाथा चेयं भूर्भवति ॥ ७१ ॥
नास्ति तेषु जातिविद्यारूपकुलधनक्रियादिभेदः॥७२॥
यतस्तदीयाः ॥ ७३ ॥

अर्थ.

भज्य देव, भक्त व भक्ति ह्या त्रिपुटीचा लय करून नित्यदास्यभक्तीनें ( मारुतिरायासारखें ) किंवा नित्यकांताभक्तीनें (लक्ष्मीसारखें, गोपींसारखें) प्रेम करावें, आणि प्रेमच करावें ( म्ह० प्रेमावांचून कशानेंहि नारायण प्रसन्न होणार नाहीं ). सर्व भक्तांत मुख्य भक्त म्हणजे जे एकनिष्ठ एकविध भक्त आहेत तेच होत. असे भक्त प्रेमानें कंठ दाटून येत आहेत, शरीरावर रोमांचादि अष्ट सात्विक भाव उत्पन्न होत आहेत, निरंतर प्रेमाश्रूंचें स्नान घडत आहे अशा तऱ्हेनें नारायणाच्या दिव्य कथा परस्परांस सांगत ऐकत असतात. ते दोहींकडचीं कुळें पावन करितात, इत-

केंच काय पण सारी पृथ्वी पावन करितात. ते तीर्थांना तीर्थपण देतात, कर्मांवर सत्कर्माचा छाप मारतात व शास्त्रांना सच्छास्त्रें करितात, कारण ते स्वतः तीर्थरूप असतात. सत्कर्म व सच्छास्त्र यांचे ते मूर्तिमंत पुतळे असतात त्यांचें चरित्र पाहून पितृलोकीं पितर संतुष्ट होतात, देवता आनंदित होऊन नाचतात व पृथ्वी सनाथ होते. त्यांच्यांत मग जाति, विद्या, रूप, कुल, धन, क्रिया इत्यादिकांचे भेद रहात नाहींत; कारण ते सर्वांतर्यामी जो हरि तद्रूप झालेले असतात.

## स्पष्टीकरण.

( ६६ ) देवावर प्रेम करायचे दोन प्रकार येथें सांगितले आहेत. दासाचें स्वामीवर प्रेम असतें तो एक दास्यभक्तीचा प्रकार व कांतेचें स्वपतीवर प्रेम असतें तो कांताभक्तीचा प्रकार. दास्यभक्तीचें उत्कृष्ट उदाहरण मारुतिरायाचें किंवा गरुडाचें. रामरायाची सेवा मारुतीनें कशी केली ते रामायणांत प्रसिद्ध आहेच. ' पडिलें कार्य तितुकें करावें । सदा सन्निधचि असावें । देवद्वारीं ॥ ' हें दास्यभक्तीचें वर्णन रामदासांनीं केलें आहे. देवकार्य करणें ही दासभक्ति होय. कायावाचामनें सर्व स्वामीला अर्पण करून स्वामीवांचून ब्रह्मांडांत दुसरें कांहींच न जाणणें अशी आत्मनिरपेक्ष भक्ति दासभक्तच करूं शकतात. ' जोडूनियां कर । उभा सन्मुख समोर । ' असें मारुतिरायाचें ध्यान मनांत आणून तुकोबांनीं त्यांची प्रार्थना केली आहेः—

### अभंग.

शरण शरण हनुमंता । तुज आलों रामदूता ॥ १ ॥
काय भक्तीच्या त्या वाटा । मज दावाव्या सुभटा ॥ २ ॥
शूर आणि धीर । स्वामीकाजीं तूं सादर ॥ ३ ॥
रामरायाच्या सेवका । शरण आलों म्हणे तुका ॥ ४ ॥

दासभक्तीचें मर्म शिकावयाचें असेल तर मारुति-उपासना करावी, मारुतिरायाला गुरु करावें. वाचकांनीं तुकोबारायांच्या गाथ्यांतील 'पाईकी'चे अभंग मननपूर्वक वाचावेत म्हणजे पाईकी, शिपाईगिरी, सेवा, दास्य याचें मर्म त्यांच्या लक्षांत येईल. त्यांतील चारदोन महत्त्वाचे चरण येथें देतोंः—

( १ ) तरी व्हावें पाईक जीवाचे उदार ।
सकळ त्यांचा भार स्वामी वाहे ॥ १ ॥
( २ ) पाईकांनीं सुख भोगिलें अपार ।
शूर आणि धीर अंतर्बाह्य ॥ २ ॥
( ३ ) पाईकांनीं पंथ चालविल्या वाटा ।
पारख्याचा सांठा मोडोनियां ॥ ३ ॥
( ४ ) तो एक पाईक पाईका नाईक ।
भाव सकाळिक स्वामीकाजीं ॥ ४ ॥
तृणवत् तनु सोनें ज्या पाषाण ।
पाईक त्या भिन्न नाहीं स्वामी ॥ ५ ॥
( ५ ) आपुलिया सत्ता स्वामीचें वैभव ।
भोगिती गौरव सकळसुख ॥ ६ ॥

असो. ही दास्यभक्ति झाली. आतां कांताभक्ति सांगतो. देवाचे चरण लक्ष्मी जशी नित्य हातांत वागवून त्यांची सेवा करीत आहे तसे देवाचे चरण हृदयीं दृढ धरणें ही कांताभक्ति होय. दास्यभक्ति काय आणि कांताभक्ति काय दोन्ही एकच आहेत. नांवें निराळीं. चरणसेवा ही लक्ष्मीनें उत्तम चालविली आहे. ह्या आईसाहेब गुरु आहेत. त्यांच्यापासून ती शिकावी. " हे माझी मिरासी । ठाव तुझ्या पायापाशीं ॥ १ ॥ याचा धरीन अभिमान । करीन आपुलें जतन ॥ २ ॥ " कांता पतीशीं एकजीव होऊन जाते, तसें देवाशीं एकजीव होऊन जावें. पतीचें तें माझें, पतीचें धन तें माझें धन, पतीची सेवा ती माझीच सेवा, जें जें पतीचें तें तें माझें, पतीचें वैभव तें माझें वैभव, पतीचा जो मानापमान तो माझा मानापमान, असें कांता मानते. समसत्ता भावल्यामुळें पतीच्या घरचें केरपोतेरें करण्यांतही तिला हलकेपणा वाटत नाहीं. भक्तही देवाशीं असाच मिळून मिसळून वागतो. दास्यभक्तीचें मर्म पिढ्यान्‌पिढ्या नौकर वागविण्याचें किंवा होण्याचें ज्यांच्या कपाळीं असेल तेच जाणतील. सध्यां रोजीवर किंवा मासिक वेतनावर चाकरी करण्याचा प्रघात वाढत असल्यामुळें स्वामिसेवकपणाचें थोर नातें

बुडत चाललें आहे! पन्नास पाऊणशें वर्षे घरांत इमानानें राहिलेल्या सेवकाला धन्याच्या घराण्याचा केवढा अभिमान व प्रेमा वाटतो व त्याचेंही धन्यावर केवढें वजन असतें, याची.उत्तरोत्तर कल्पनाही नाहींशी होणारसें दिसतें. देवही दासाच्या अंकित होतात, 'तुका ह्मणे भावें । देवा सत्ते राबवावें ॥' स्वामिसेवकांचें ऐक्य झालें कीं 'दासी कीं गोसाविण जाहली' हेंच कळेनासें होतें आणि मौज अशी आहे कीं जो खरें दास्य करतो तो स्वामीच्याही डोक्यावर जाऊन बसतो व जी खरी पतिसेवा करते तिचा आपल्या स्वामीवर अंमलही पण तसाच चालतो! सेवेचा कडेलोट झाला कीं सर्ट्दिशीं पारडें उलटें होऊन स्वामी तो सेवक होतो व सेवक तो स्वामी होतो! अशी प्रेमाची परकाष्ठा झाली कीं, स्वामी, सेवक व सेवा किंवा पति, पत्नी व सेवा ह्या त्रिपुटीचा न कळत लय होऊन तिन्ही मिळून एकच बाकी रहाते. त्याला मग तुम्ही देव म्हणा, भक्त म्हणा अथवा कांहींही ह्मणा—त्या एकपणांत, तसें समरस होऊन जाण्यांत, त्या अभिन्नपणाच्या सेवाधर्मांत जी माधुरी आहे तिची गोडी अनुभविकच जाणतील! ती मधुर भक्ति गोपींनीं केली व प्रेमाचें अपार सुख भोगिलें.

( ६७ ) ह्मणूनच एकांतभक्तांला, एकविध, एकनिष्ठ भक्तांना नारदांनीं सर्व भक्तांत पहिला नंबर दिला आहे. प्रेममय झालेल्या भक्तांना सर्वकाळीं व सर्वस्थळीं नारायणावांचून दुसरा विषय नसतो. स्वामीच्या चरणकमलाच्या ध्यानानें चित्त स्थिर होतें, अन्य संकल्प उठत नाहींत, 'दुजियापासून परतलें मन' असा विश्वास बळावतो, आणि हरि स्वाधीन होतो. तुकोबारायांचे एकांतभक्तीचे उद्गार पहाः—

## अभंग.

### १.

एकविध आम्हीं न धरूं पालट । न संडूं ते वाट सांपडली ॥ १ ॥
म्हणवूनि केला पाहिजे सांभाळ । माझें बुद्धिबळ पाय तुझे ॥ ध्रु० ॥
बहुत बोलतां न कळे प्रकार ।। अंतरा अंतर साक्ष असे ॥ २ ॥
तुका ह्मणे अगा जीवींच्या जीवना । तूंचि नारायणा साक्षी माझा॥३॥

२.

आणिक दुसरें मज नाहीं आतां। नेमिलिल्या चित्तापासूनियां ॥ १ ॥
पांडुरंग ध्यानीं पांडुरंग मनीं। जागृतीं स्वप्नीं पांडुरंग ॥ ध्रु० ॥
पडिलें वळण इंद्रियां सकळा। भाव तो निराळा नाहीं दुजा ॥ २ ॥
तुका म्हणे नेत्रीं केली वोळखण। तटस्थ हें ध्यान विटेवरी ॥ ३ ॥

( ६८ ) असे चार एकांतभक्त एकत्र जमले व त्यांनीं तोंड उघडलें तर देवाच्याच गोष्टी ते सांगतील व ऐकतील. व्यापारी मंडळांत व्यापाराच्या, नाटक्यांत नाटकांच्या, राजकीय पुरुषांत राजकारणाच्या, विद्यार्थ्यांत अभ्यासाच्या, कायदेपंडितांत कोर्टाच्या गोष्टी हटकून निघायच्याच, तसें चार भक्त एकत्र जमले कीं भक्तीच्याच गोष्टी निघायच्या. जें ध्यानीं मनीं असतें तेंच वाचेवर उगवतें. नारदांनीं ह्या सूत्रांत ' परस्परं लपमानाः ' म्हणून जें सांगितलें तेंच गीताभागवतांतही सांगितलें आहे.

( १ ) स्मरंतः स्मारयंतश्च मिथोऽघौघहरं हरिम्। भक्त्या संजातया भक्त्या बिभ्रत्युत्पुलकां तनुम् ॥ परस्परानुकथनं पावनं भगवद्यशः।

—श्रीभागवत ११–३–३१.

( २ ) मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम्। कथयंतश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमंति च ॥ —श्रीगीता १०–९.

हरिकथा गात्याऐकत्यांना तल्लीन करून सोडतातः—

( १ ) चित्तचैतन्यां होतां भेटी। हर्षें बाष्प दाटे कंठीं। पुलकांकित रोमांच उठी। उन्मीलित दृष्टि पुंजाळे ॥ करितां अच्युताचिंतन। सप्रेम गहिंवरे मन। अट्टहासें करी रुदन। अनिवार स्फुंदन ऊर्ध्वश्वासें ॥ परस्परें निज संवादू। करितां जाला स्वरूपावबोधू। नेत्रीं जळ अंगीं खेदू। प्राणस्पंदू पांगुळे ॥ तेणें निजनृत्य विनोदें। फावलेनि निजबोधें। नानापरींचीं भगवत्पदें। सुखानुवादें स्वयें गातु ॥ तेणें कीर्तनकीर्तिगजरें। त्रैलोक्य सुखें सुभरे परमानंदूही हुंबरे। सुखोद्गारें तुष्टोनी ॥

—श्रीएकनाथी भागवत.

( २ ) चित्तें मीचि जाहले। मियेंचि प्राणें धालें। मग जीवों मरों विस-

रले। बोधाचिया भुली ॥ ११९ ॥ मग तया बोधाचेनि माजें। नाचती संवादसुखाचीं भोजें। आतां एकमेकां घेपे दीजे। बोधचि वरी ॥ १२० ॥ जैसीं जवळिकेचीं सरोवरें। उचंबळलियां कालवती परस्परें। मग तरंगांसी घवळारें। तरंगचि होती ॥ १२१ ॥ तैसीं येरयेरांचिये मिळणीं। पडत आनंदकल्लोळांची वेणी। तेथें बोध बोधांची लेणी। बोधेंचि मिरवी ॥१२२॥ जैसें सूर्यें सूर्यातें वोवाळिलें। कीं चंद्रें चंद्रम्यां क्षेम दिधलें। ना तरी सरिसेंचि पाडें मिनले। दोन्ही बोध ॥ १२३ ॥ जैसी कमळकळिका जालेंपणें। हृदयींचिया मकरंदातें राखों नेणे। दे राया रंका पारणें। आमोदाचें ॥१२७॥ तैसेंचि मातें विश्वीं कथित। कथिलेनि तोषें कथूं विसरत। मग तया विसरामाजि विरत। अंग मनें ॥ १२८ ॥ ऐसें प्रेमाचेनि बहुवसपणें। नाहीं रातीदिवो जाणणें। केलें माझें सुख अव्यंगवाणें। आपणपेयां जिहीं ॥ १२९ ॥

—ज्ञानेश्वरी अ० १०.

असो. ६८ व्या नारदीय सूत्राचें स्पष्टीकरण गीताभागवतांतील श्लोकांनीं व त्यावरील ज्ञानोबानाथरायांच्या अमृताधिक मधुर वाणीनें होत असल्यामुळें येथें आह्मीं आपल्या वाणीचें प्रस्थ माजवीत नाहीं. त्यांनीं जो स्वानुभव सांगितला तो त्यांच्याचसारख्या भक्तोत्तमाच्या संगतींत चाखावयास मिळत असल्यामुळें त्याची फेड प्राकृतवाणीनें अधिक काय करावयाची आहे ?

( ६९-७१ ) असो. असे भक्तराय जन्मास आले म्हणजे ते उभयकुळें पावन करितात हें काय सांगावयास पाहिजे ? ते सारी पृथ्वी पावन करितात. ते तीर्थांना तीर्थपण देतात, कारण ते तीर्थांचे तीर्थरूप आहेत. ते जें शास्त्र हातीं धरतात त्यावर सच्छास्त्र असा शिक्का बसतो. ते जें कर्म आचरतात तेंच जगाला सत्कर्म म्हणून आदरणीय वाटतें. साधु जेथें स्नान करितात, जेथें संचार करितात, जेथें देह ठेवितात तें तीर्थ, ते जें बोलतात तें शास्त्र, ते जें आचरतात तें सत्कर्म. संतांनीं ज्यांचा स्वीकार केला व त्यांच्या पसंतीचा ज्यावर शिक्का पडला तें ( current coin ) व्यवहारांतलें नाणें होऊन दुनियेंत सर्वमान्य होतें. ज्ञानेश्वरमहाराजांनीं खांद्यावर पताका टाकून हातीं टाळ घेऊन पंढरीचा सांप्रदाय पाडला ह्मणून कोटयवधि लोकांना पंढरिरायाचें

प्रेम उत्पन्न झालें. फार काय पण ते म्हणतील तें रूप घेऊन, म्हणतील त्या ठिकाणीं, म्हणतील तोंवर देवाला ठाण मांडून रहावें लागतें! पुंडलिकाच्या भाकेसाठींच ना विठोबाला अठ्ठावीस युगें विटेवर उभें रहावें लागलें आहे! व्यास, वाल्मीकि, शुक, वामदेव, नारद, मारुतिराय, उद्धव, राधा, कृष्ण-चैतन्य, कबीर, तुळसीदास, मिराबाई, ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास, तुकाराम, नामदेव, नरसी मेहता इत्यादि भगवद्भक्तांनीं जीं जीं स्थळें पावन केलीं तीं तींच तीर्थपदाला पावलीं आहेत. ते जें बोलले तेंच ना आपलें भवोद्धारक शास्त्र बनलें आहे? त्यांनीं जीं कर्में केलीं, अनुवादिलीं व उपदेशिलीं तींच सत्कर्मे म्हणून ना भरतखंडभर मानलीं जात आहेत? यांनीं रामकृष्णहरीचीं व हरिहरांचीं नामें घेतलीं म्हणूनच ना नामस्मरण हा तुम्हांआम्हांला उद्धाराचा सुलभ मार्ग सांपडला आहे? यांनीं देवाला सगुणसाकार केलें, म्हणूनच ना 'सुंदर तें ध्यान उभें विटेवरी' आमच्या-साठीं तिष्ठत राहिलें आहे? वाल्मीकिमुनींनीं रामायण गायिलें नसतें व तुळशीदासरामदासादिकांनीं रामोपासनेचा मार्ग आम्हांला आचरून दाख-विला नसता तर रामनामामृत जें कोटयवधि जिभांनीं हजारों वर्षें प्राशन केलें आहे तें त्या जिभांना कोठून मिळालें असतें? विठ्ठलाचें नाम नाम-देवतुकोबांनीं परम आवडीनें व अट्टाहासानें घेतलें नसतें तर ते ब्रह्मांड भेदून पैलाड कसें गेलें असतें? गीताशास्त्र शंकराचार्य-ज्ञानेश्वरांनीं आदरलें नसतें तर त्याला कोणी पुसलें असतें? अठरा पुराणांतून भागवतपुराणाचा नाथांसारख्यांनीं डिंडिमा पिटला नसता तर तें सच्छास्त्र म्हणून कोणीं मानलें असतें? देहूस तुकोबांनीं व आळंदीस ज्ञानोबांनीं स्वचरित्रानें दिव्यत्व आणलें नसतें तर इंद्रायणीला तीर्थ म्हणून कोण मानणार होता? गांवखरीच्या ओढ्यापेक्षां त्या पाण्यांत कांहीं जास्त आहे काय? तात्पर्य, हा सर्व ह्या जगताला पावन करण्यासाठीं अवतरलेल्या भक्तांचा उपकार आहे. "संत धर्माचें धर्मक्षेत्र। संत स्वरूपाचें सत्पात्र। नातरी पुण्यासी पवित्र। पुण्यभूमि॥" असें समर्थांनीं म्हटलें आहे तें यथार्थ आहे. मनुष्यसमा-जाला आपल्या देवभावाची ओळख करून देणारे संत जगाचे मायबाप आहेत. असे महात्मे अवतरून जगाचें कार्य करीत असले म्हणजे देवता

प्रसन्न होतात, पितरांना धन्यता वाटते व भू सनाथ होते, यांत आश्चर्य काय? संत प्रकटले ह्मणजे त्यांच्यासाठीं देव अवतार घेऊन भूभार हलका करितात व धर्मसंरक्षण होतें.

(७२) भक्तांच्या ठिकाणीं जात, विद्या, कुल, धन इत्यादिकांचा भेद नसतो. भक्ताची जात कोणतीही असो, तो कितीही अविद्वान् किंवा विद्वान् असो, तो श्रीमंत असो वा दरिद्री असो, त्याच्या हृदयांत जर श्रीहरि भरला आहे तर तो विश्ववंद्यच आहे. 'उंच नीच कांहीं नेणें भगवंत'. चोखा डोंगा होता, पण त्याचा भाव डोंगा नव्हता म्हणूनच तो मान्य झाला आहे. दुराचारी पाखांडी ब्राह्मणाहून सदाचारी भगवद्भक्त महार कोटपटीनें श्रेष्ठ आहे. जनाबाईच्या गोंवऱ्या व चोखामेळाचीं हाडें 'विठ्ठल विठ्ठल' बोललीं यावरून त्यांचे देह विठ्ठलानें कसे भरले होते हें दिसतें. चोखामेळा, सजन कसाइ यांची जात कोण पाहतो? ध्रुव व उपमन्यु यांच्यापाशीं विद्या कोणती होती? सुदामदेवापाशीं द्रव्य किती होतें? कुब्जा दासीचें रूप कसें होतें? तात्पर्य, मुख्य हरिप्रेम ज्यांच्या रोमरोमांत भिनून गेलें आहे ते ह्या सर्व भेदांतून पार गेले आहेत. ते विश्ववंद्य झाले आहेत. ब्राह्मणपणा हा अभिमान नको व महारपणा ही लाज नको. रामकृष्णहरीच्या भजनानें भक्तांच्या कुळांतलें होऊन जावें हेंच मनुष्याचें मुख्य कर्तव्य आहे. जो अभेदभजनानें एकमय हरीच्या स्वरूपांत रंगून गेला तो भेदमय मायेच्या पैलपार गेला.

---

# १२ वाद नको !

—:•:—

**वादो नावलंब्यः ॥ ७४ ॥**

**बाहुल्यावकाशादनियतत्वाच्च ॥ ७५ ॥**

**अर्थ.**

वादांत पडूं नये. वादांत पडल्यानें शब्दानें शब्द वाढतो व तत्त्व बाजूला राहून ( व्यक्तीच्या गुणदोषांची उठाठेव होते आणि ) पुष्कळ शब्दांचा कीस पडतो. शिवाय वाद सुरू झाल्यावर त्याला कांहीं नियमांचा धरबंद रहात नाहीं व वाद अफाट वाढून शेवट बहुधा वैरांत होतो.

**स्पष्टीकरण.**

( ७४ ) हीं सूत्रें फार महत्वाचीं आहेत. सर्वांनीं व मुख्यतः मुमुक्षूंनीं हीं निरंतर ध्यानांत ठेवून वादापासून दूर रहावें. 'वादे वादे जायते तत्त्वबोधः' असें म्हणतात खरें, पण बहुधा 'वादे वादे वर्धते वैरवह्निः' असाच सर्वत्र सर्वांना अनुभव येतो. तत्त्वबोध होण्याच्या ऐवजीं 'मी तूं' सुरू होऊन वादानें उभयपक्षीं अहंभावाचा उठाव होतो व स्नेहभावास खग्रास ग्रहण लागून दुर्वृत्तिरूप पिशाच्चांचा थयथयाट सुरू होतो. तत्त्वासाठीं म्हणून प्रथम वाद सुरू झाला तरी त्याचें पर्यवसान बहुधा वैरांत होतें. वादांत व्यक्तीव्यक्तीच्या उखाळ्यापाखाळ्या निघतात, त्यांनीं मर्मभेद होऊन अंतःकरणें दुखविलीं जातात, माझेंच खरें व तुझेंच खोटें असा दुरभिमान वाढून प्रतिपक्षाचे गुणही दोषरूप वाटूं लागतात व स्वतःच्या दोषांचेंही मंडण करण्यास मनुष्य प्रवृत्त होतो. भाजीविक्या माळणीपासून तों थोर राष्ट्रकार्य करणाऱ्या मुत्सद्द्यांपर्यंत भांडणाची एकच तऱ्हा आढळते. अशिक्षित मनुष्य ग्राम्य शब्दांत शिव्या देतात व सुशिक्षित मनुष्य लट्ठलट्ठ संस्कृत शब्दांत तसेच भांडतात. अप्पया दीक्षितांनीं व्याकरणावर 'मनोरमा' ग्रंथ केला कीं, जगन्नाथपंडित 'मनोरमाकुचमर्दन' करण्यास प्रवृत्त होतात ! इंग्रजी, संस्कृत, मराठी किंवा इतर कोणत्याही वाङ्मयांत 'चुर-

शीचे सामने' शेंकडों पाहण्यास मिळतात. प्रसिद्ध राजकीय तत्त्ववेत्ता बर्क व वक्ता फॉक्स यांचा चिरस्नेह कोणत्या कारणानें लुप्त झाला हें इंग्रजी इतिहासज्ञांस विदित आहेच. बाप जुन्या मताचा व लेक नव्या मताचा असल्यामुळें त्यांच्यांत खडाजंगी कशा उडतात व ६३ चा आंकडा केवळ वादामुळें उलट खाऊन ३६ चा कसा होतो हें पुष्कळांच्या पाहण्यांत किंवा ऐकण्यांत तरी असेलच. असो. आपणास याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. हें असेंच चाललें आहे व चालायचें आहे; तथापि सात्त्विकांनीं वादापासून चार पावलें दूरच रहावें. सच्छील विचारवंत भेटल्यास क्वचित् वाद केल्यास चालेल, पण विवाद मुळींच करूं नये. दुसरा मनुष्य करतो असें दिसल्यास मौन धरावें म्हणजे 'अतृणे पतितो वह्निः स्वयमेवोपशाम्यति' या न्यायानें आपण आखाड्यांत उडी टाकली नाहीं म्हणजे तो कांहीं काळानें तरी शांत होईल. वादाची खुमखूम जागच्या जागीं जिरवून टाकावी व 'सुसरीबाई तुझी पाठ मऊ' म्हणून स्तब्ध बसावें. संवाद मात्र करावा. 'जगीं सुखसंवाद सुखें करावा' अशी समर्थांची शिकवण आहे. सुखसंवाद उगमाचा म्ह० श्रीहरीचा करावा. तो संतसज्जनांच्या संगतींत अवश्य करून स्वसुख द्यावें घ्यावें. 'जनीं वादविवाद सोडोनि द्यावा,' असें समर्थ सांगतात, पण तेच सुखसंवाद करण्यास परवानगी देतात. सुखसंवाद खरोखर गुरुशिष्यांत होतो व स्वानुभवी संतांत होतो किंवा प्रेमळ मुमुक्षुसाधकांत होतो. वृत्ति भंग पावेल असें बोलूं नये व ऐकूं नये. दुसऱ्याची वृत्ति दुखवूं नये व आपली दुखण्याचा जेथें संभव आहे त्या संगतींत बसूं नये. 'अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत्। स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते' हें वाङ्मय तप आचरावें. स्वतःच्या दोषांकडे व दुसऱ्याच्या गुणांकडेच पाहण्याची संवय ठेवावी. दोष बोलावयाचेच असल्यास ते त्याच्या कल्याणासाठींच एकांतांत ज्याचे त्याच्याशीं बोलावे. लौकिकांत दुसऱ्याचा उपहास करूं नये; त्याचें वर्म काढूं नये; त्याची मानखंडणा करूं नये. बोलावयाचेंच असल्यास पुढील **दहा दोष** टाळून बोलावें असें ज्ञानेश्वरमहाराज म्हणतातः--

१ विरोध--वादवळ.

२ प्राणितापढाळ--त्यास कासावीस करणें.

३ उपहास.

४ छळ.

५ वर्मस्पर्श.

६ आटूवेग–कोरडें आवेशाचें बोलणें.

७ विंदाण–कपटाचें भाषण.

८ आशा–आशा पोटांत ठेवून बोलणें.

९ शंका–शंका उत्पन्न होईल तें बोलणें.

१० प्रतारण–ठकबाजी, फसवेगिरी.

हे दहा दोष टाळून " साच आणि मवाळ । मितळे आणि रसाळ । शब्द जैसे कल्लोळ । अमृताचे ॥ " ( ज्ञानेश्वरी, अ. १४–३७० ) असें बोलावें. आधीं न बोलावें हें उत्तमोत्तम. मौनासारखी मौज नाहीं. इंग्रजींत ' मौन हें सोनें आहे व भाषण हें रुपें आहे ' अशा अर्थाची एक म्हण आहे. ' मौनं सर्वार्थसाधनम् ' ही म्हणही मोठी शहाणपणाची आहे. ज्ञानाची सीमा मौनांत होत असल्यामुळें श्रुतींनेंही ईश्वराबद्दल 'नेति नेति' म्हणून मौनच धरलें आहे. मौन ही ब्रह्माची भाषा आहे. मौन हें आनंदाचें शिखर आहे. मौन हें स्वानुभवाचें माजघर आहे. मौन हें परमात्म्याचें राशिनांव असून 'स्तुति कांहीं न बोलणें'. म्हणजे मौन हीच त्याची स्तुति आहे, असें ज्ञानोबारायांनीं म्हटलें आहे. तोंड उघडलें कीं, चुकून एखादा शब्द निघेल व तो दुसऱ्याच्या चित्ताला खुपेल म्हणून मौन हेंच उत्तम. मौनानें काय साधत नाहीं ? व बोलून काय बिघडत नाहीं ? बोलण्यानें प्रपंचांतही दगा बसतो व परमार्थही नासतो. रसना न आंवरतां आल्यामुळें दुनियेंत तिनें जेवढे अनर्थ केले आहेत तेवढे कोणत्याही दुसऱ्या इंद्रियानें केले नाहींत ! रसना आंवरील तो जग पादाक्रांत करील ! रसना ज्याच्या स्वाधीन नाहीं त्याचे सर्व पराक्रम निष्फल होतात. रसनेचीं कार्यें दोन. एक आहार व दुसरें भाषण. रसना न आंवरल्यामुळें शरीरांत रोग व जगांत वैरी उत्पन्न होतात. म्हणून रसनाजय हा सर्व पराक्रमांत श्रेष्ठ आहे. ज्यानें रसनेचा आवेग सहन केला तो जगाला भारी आहे. तात्पर्य, रसना स्वाधीन ठेविली पाहिजे व बोलणेंच झाल्यास

सत्य, मित, हितकर व रसाळ असेंच बोललें पाहिजे. वादांत रसना अनावर होते व अनर्थपरंपरा उभयपक्षास सोसावी लागते म्हणून रसनाजय साधून बोलावें. राजकारण, वाङ्मयव्यवहार इत्यादि कांहीं व्यवहार वादावांचून सुफलदायी होणार नाहींत हें म्हणणें खरें असलें, तरी ह्याही विषयांवरील वादांत बहुधा वरील दहाही दोष प्रधानपणें दिसत असल्यामुळें वादानें जगाचें अधिक नुकसानच झालें आहे. रसनाकिंकर शंभर बोलले तरी त्यांचें सर्व कार्य एक रसनाजयी करील, यांत शंका नाहीं. ज्यांचा रसनाजय झालेला नाहीं अशा शंभर विद्वानांनीं शंभर सभांत वादविवाद करूनही जो तत्त्वबोध होत नाहीं, तो रसनाजय केलेला एक पुरुष एका भाषणानें किंवा एका ग्रंथानें करूं शकतो ! जगांतले अत्यंत महत्वाचे सिद्धांत वादानें ठरले नाहींत. सत्यसिद्धांत शुद्धचित्त पुरुषाच्या हृदयांत अपाप आविर्भूत होतात व सिद्धांत जगाला असेच प्रेरित महात्म्यांकडून मिळालेले आहेत. सिद्धांताचें मिष करून विद्वान लोक शब्दांचे भूस काढीत अहंकाराचा सैतान मात्र उभा करीत असतात. बरें, जगाला सिद्धांत सांगतांनाहि वादाची गरज नाहीं. वादानें जग सुधारलेलें नाहीं. भाषणानें, वादानें कोणीं कोणाचें ऐकत नाहीं. जग आचरण पाहून सुधारतें तितकें उपदेश ऐकून सुधारत नाहीं. वादाचा इतरांवर कांहीं चांगला परिणाम होत नाहीं. याप्रमाणें वादानें स्वपरहित कोणतेंच साधत नसून अनहित मात्र अतिशय होतें ह्मणून नारदांनीं 'वादो नावलंब्यः' हा नियम सर्वांसच घालून दिला आहे.

( ७५ ) वादांत पडूं नये असें सांगितल्यानंतर नारदांनीं त्यांस दोन कारणें पुढें केलीं आहेत. एक तर वादांत बाहुल्यावकाश असतो म्हणजे उभयपक्षीं पुष्कळसें बोलायला पुष्कळ जागा असते. 'ईश्वर आहे कीं नाहीं.' ह्या विषयावर दोन्ही बाजूंनीं दोघांनाही शब्दांचा कीस पाडून पुष्कळ बोलतां येईल; पण विचार केला तर ही गोष्ट वादाची कां आहे ? स्वानुभवाची जी गोष्ट आहे ती वादानें का सिद्ध किंवा बाधित होणार आहे ? कोणता ईश्वरनिष्ठ पुरुष ह्या विषयावर वाद करावयास पुढें आला आहे ? आपल्या अंगचा अधिकार वाढवीत वाढवीत गुप्चिप् जें हरिपद पटकावयाचें आहे तें वादांत अनुकूलप्रतिकूल चर्चेनें कां मिळणार आहे ?

'मतांतरें शोधूं नका व तार्किकांचा संग टाका' म्हणून अधिकारयुक्त वाणीनें तुकोबांनीं कां सांगितलें आहे ? हा तर्काचा विषय नाहीं; तर्काला येथें प्रतिष्ठा नाहीं म्हणूनच ना ? स्वसंवेद्य, अनुभवरूप जी वस्तु आहे ती वादांत आणूं नये. आणाल तर शब्दांचे भारेच्या भारे पडतील, पण त्यांत सार कोठेंच हाताला लागणार नाहीं. वादांत न पडण्याचें दुसरें कारण नारदांनीं दिलें आहे तें अनियतत्व हें होय. वादांत नियमाचें मग बंधन राहत नाहीं. मोकाटपणाच वाढतो. बरें, एखाद्या प्रश्नाचा वादानें एकदां निकाल झाला, बहुमतानें झाला तरी सभेबाहेरचे लोक किंवा पुढील पिढ्यांचे लोक तो निर्णय मान्य करून पुन्हां वाद करणार नाहींत याबद्दल तरी हमी कोण घेणार ? साक्षात् ब्रह्मदेवालाही ती घेतां येणार नाहीं. शिवाय अनंत वृत्तींचे अनंत लोक असल्यामुळें ह्या विचित्र जगांत सर्वच लोक एका नियमाच्या रेषेंत येऊन तेथं स्थिर राहतील याची केव्हांही शाश्वती नाहीं. तात्पर्य स्वहित साधावयाचें तर वादांत पडूंच नये.



## १३ भक्ताची राहणी व भक्तास आश्वासन.



भक्तिशास्त्राणि मननीयानि तदु-
द्बोधकरकर्माणि करणीयानि ॥ ७६ ॥
सुखदुःखेच्छालाभादित्यक्ते काले प्रतीक्ष्य-
माणे क्षणार्धमपि व्यर्थं न नेयम् ॥ ७७ ॥
अहिंसासत्यशौचदयास्तिक्यादि-
चारित्र्याणि परिपालनीयानि ॥ ७८ ॥
सर्वदा सर्वभावेन निश्चिंतितैर्भगवा-
नेव भजनीयः ॥ ७९ ॥
स कीर्त्यमानः शीघ्रमेवाविर्भवति
अनुभावयति भक्तान् ॥ ८० ॥
त्रिसत्यस्य भक्तिरेव गरीयसी भक्ति-
रेव गरीयसी भक्तिरेव गरीयसी ॥ ८१ ॥

अर्थ.

भक्तिशास्त्राचें मनन करावें व जेणेंकरून चित्तांत भक्तीचा उद्भव होईल अशींच कर्मे आचरावींत. सुख, दुःख, इच्छा, लाभ इत्यादिकांची पर्वा न करणारा काल भक्षण करण्यास उद्यत असतांना भगवद्भक्तीवांचून आयुष्याचा एक क्षणही व्यर्थ दवडूं नये. अहिंसा, सत्य, शौच, दया, आस्तिक्य इत्यादि उत्तम व आचरणीय गुणांचें परिपालन करावें; सर्वदा सर्वभावाने भगवंताचेंच चिंतन करावें; त्याचे गुणानुवादांत भक्त रंगून जाऊं लागला, कीं तो भक्तवत्सल भगवान् तात्काळ प्रत्यक्ष प्रकट होतो व आपल्या भक्तावर पूर्ण कृपा करितो. नारद म्हणतात कीं भगवत्प्राप्तीच्या सर्व

साधनांत भक्तिच श्रेष्ठ आहे. हें मी तीनवार ( हातावर टाळी मारून ) सत्य सांगतों.

## स्पष्टीकरण

(७६) मागें नवव्या सूत्रांत 'लोकवेदेषु तदनुकूलाचरणम्' ह्या० लौकिक व वैदिक कर्मे जीं भक्तीला अनुकूल असतील तीं करावींत व इतर कर्माविषयीं उदासीन असावें म्हणून सांगितलें होतें तेंच ह्या सूत्रांत पुन्हां पर्यायानें सांगितलें आहे. "ज्याला भक्ति करावयाची त्याला ग्रंथ वाचावयाला पाहिजेत का हो ?—त्याला कर्मे करावयाला पाहिजेत का हो !—" असे प्रश्न नेहमीं विचारण्यांत येतात. ह्या प्रश्नाला नारदांनीं ह्या सूत्रांत उत्तर दिलें आहे. शास्त्राध्ययन व विद्याभ्यास हे कांहीं भक्तीचे मारक नाहींत. पुष्कळदां विद्येचा परिणाम अहंकारांत व छलवादांत झालेला दिसतो, पण हा विद्येचा दोष नसून अध्ययनाबरोबर जें अनुपान घ्यावें लागतें तें न घेतल्याचा दोष आहे. मनुष्य विद्वान् झाला कीं, त्यानें ज्याच्या त्याच्यावर तोंड टाकावें व जेव्हां तेव्हां आखाड्यांत उडी घेऊन दंड ठोकून वादास उभें रहावें असें कांहीं नाहीं. 'विद्या विवादाय न, किंतु ज्ञानाय' हें लक्षांत ठेवलें पाहिजे. 'विद्या ददाति विनयं' हा न्याय आहे. पण विद्या पचली नसेल तर अविनयच उत्पन्न होतो. 'नको शास्त्र अभ्यास व्युत्पत्ति मोठी। जडे गर्व ताठा अभीमान पोटीं ॥' असें समर्थांनीं म्हटलें आहे तें अनुभवसिद्धच आहे, पण यामुळें मुळींच शास्त्राध्ययन नको असें होत नाहीं. म्हणूनच नारदांनीं ह्या सूत्रांत शास्त्राध्ययनाला मर्यादा घातली आहे. ते म्हणतात, कीं, भक्तिशास्त्रांचें मनन करावें. ज्याला पांडित्य मिरवायला नको असेल व नारायणाच्या प्राप्तीचीच चाड असेल त्यानें इतर शास्त्रांच्या खटपटींत न पडतां नारायणाची भक्ति व भगवद्भक्तांच्या कथाच ज्यांत सांगितल्या आहेत अशा भक्तिशास्त्राचेंच अध्ययन करावें. सर्व साधुसंत गीताभागवत वाचायला सांगतात तें याचसाठीं. तुकोबारायांनीं सुद्धां कांहीं संतांचीं वचनें पाठ केलीं होतीं. अर्जुन, उद्धव, ध्रुव, प्रल्हाद, नारद, अजामेळ, बळी इत्यादि भक्तांच्या प्रेमळ कथा वाचून आपला भक्तिभाव जमत जातो. देव भक्ताच्या कसा सन्निध असतो, भक्तांचा सांकडा कशी

वारतो, त्यांना कसा धीर देतो, त्यांचा अंतर्बाह्य शत्रूंपासून कसा सांभाळ करितो, बुद्धियोग देऊन त्यांना कैवल्यपद कसें देतो, हें भक्तकथा वाचता वाचतां व त्यांचें मनन करितां करितां आपल्या लक्षांत येतें व आपल्या चित्तांतल्या भक्तिभावाचें पोषण होतें. भक्तीचे प्रकार नऊ कां सांगितले आहेत व त्यांपैकीं कोणती भक्ति कोणीं कशी केली. हें समजून येतें व आपल्याला काय साध्य आहे याचा निश्चय होतो, म्हणून भाविक साधकांनीं अन्य ग्रंथांच्या व साधनांच्या खटाटोपींत न पडतां भक्तिशास्त्रांचेंच अध्ययन करावें व भक्तिप्रेमाचा चित्तांत विकास होईल अशींच कर्मे करावींत. कर्मकांड फार मोठें आहे व यथासांग कर्माचरण होणें दुर्घट आहे म्हणून ज्या ज्या कर्मांची मोहर हरिप्राप्तीवर आहे तीं तीं कर्मे करावींत व केवळ जड अशा कर्माविषयीं उदासीन रहावें. कर्मानें हरि जोडावयाचा आहे. हें पळभरही विसरूं नये. कर्मासाठीं, फळासाठीं, लौकिकासाठीं, इहपर सुखासाठीं, कर्म करावयाचें नसून केवळ हरिप्राप्तीसाठींच कर्म करावयाचें आहे हें ध्यानांत ठेवून कर्माचरण करावें. चित्ताला परमपुरुषाची मोहर लावून द्यावी व देह सविधिकर्माच्या स्वाधीन करावा. कर्में चार प्रकारचीं आहेत.•नित्य, नैमित्तिक, काम्य व निषिद्ध. यांपैकीं काम्य व निषिद्ध कर्में करूंच नयेत. नित्यनैमित्तिक कर्में करावींत. नित्यनैमित्तिक कर्में शास्त्रांनीं सांगितलीं आहेत व तीं अवश्य केलीं पाहिजेत; पण तीं करतांना मुद्दां कवाईत बरोबर होते कां नाहीं, लौकिक वाढतो कीं नाहीं इकडे लक्ष न देतां हरिप्रेम मुख्यतः चित्तांत जमवावयाचें आहे ही दृष्टि कायम ठेवून कर्में केली पाहिजेत. हा उद्देश न विसरतां किंबहुना त्यावरच नजर ठेवून तीं केलीं पाहिजेत, तरच तीं तारक होतील. नाहींतर तीं अधिक जखडून टाकतील. साधुसंत कर्मठपणाचा निषेध करितात, पण कर्माचरणाचा निषेध करीत नाहींत. त्यांच्या वर्तनाची हातोटी साधली तर कर्म भक्तीचें मारक नसून साधकच आहे हें लक्षांत येईल. कर्माच्या कचाट्यांत सांपडून कर्मभ्रष्ट होऊं नये. कर्म हें चित्तशुद्धीचें साधन आहे. तें टाकून चालणार नाहीं. पण तें साध्य नाहीं. त्यांतच सर्व कांहीं आहे इतकी कर्मांची

बडेजाव माजवूं नये. तात्पर्य हेंच कीं, हरि हा साध्य आहे व त्याचें भक्ति-प्रेम चित्तांत वाढत जाईल या मोहरेवर साधकांनीं लक्ष ठेवून कर्माचरण करावें.

(७७) हरिभक्ति साध्य ठरली तरी ती पुढेंमागें केव्हां तरी सावकाशीनें करूं, म्हातारपणीं पेन्शन वगैरे घेतल्यावर करूं, अशा खुशालीवर न बसतां घडीनें घडी सार्थकाची करावी व मृत्यु 'आ'पसरून झडप घालावयाला टपून बसला आहे हें सर्वकाळ ध्यानांत ठेवून पळपळ हरिसेवेंत रंगवीत जावें. 'गृहीत इव केशेषु मृत्युना धर्ममाचरेत्' याप्रमाणें परमार्थाची तांतडी करावी. म्हातारपण आल्यावर परमार्थ करूं, असें ह्मणूं तर म्हातारपण येईलच याची तरी काय शाश्वती आहे? उद्यांची खात्री नाहीं असा तर हा अश्वत्थ-संसार–आहे, ह्मणून 'मरणाचें स्मरण असावें। हरिभक्तीस सादर व्हावें।' असा साधुसंत बोध करीत असतात. पाहतां पाहतां आयुष्य क्षरत जातें. फुटक्या मडक्यांतून पाणी झिरपत जातें तसें क्षणक्षणां आयुष्य झरत आहे. नरदेह दुर्लभ आहे, तो हरि जोडल्यावांचून व्यर्थ जाऊं देऊं नये.

आयुर्नश्यति पश्यतां प्रतिदिनं याति क्षयं यौवनं
प्रत्यायांति गताः पुनर्न दिवसाः कालो जगद्भक्षकः ।
लक्ष्मीस्तोयतरंगभंगचपला विद्युच्चलं जीवितम्
तस्मान्मां शरणागतं शरणद! त्वं रक्ष रक्षाधुना ॥ १ ॥

याप्रमाणें श्रीहरीला शरण जावें. 'अनित्यमसुखं लोकं इमं प्राप्य भजस्व मां' (गीता ९–३३) असें देव स्वमुखानें सांगत आहेत. (ह्या श्लोका-वरील श्रीज्ञानोबारायांचें भाष्य अवश्य वाचावें) "जेथें चहुंकडे जळत वणवा। तेथूनि न निगिजे केविं पांडवा। तेविं लोकां येऊनि सोपद्रवा। केविं न भाजिजे मातें? ॥ ४९२ ॥ अगा मातें न भजावयालागीं। कवण बळ पां आपुलिये अंगीं। काई घरीं कीं भोगीं। निश्चिंती केली? ॥४९३॥ नातरी विद्या कीं वयसा। यया प्राणियांसि हा ऐसा। मज न भजतां भरंवसा। सुखाचा कोण? ॥ ४९४ ॥ मृत्युलोकीं सुखाची कहाणी। ऐकिजेल कवणाचिये श्रवणीं?। कैंची सुखनिद्रा आंथरुणीं। इंगळांच्या ॥ ५०१ ॥ तरि झडझडोनि वाहिला निघ। इये भक्तीचिये वाटा लाग।

जिया पावसी अव्यंग । निजधाम माझें ॥ ५१६ ॥" असो. अशा प्रकारें सर्व साधुसंतांनीं जीवांच्या डोळ्यांवरील झांपड काढून त्यांना जागें करण्याचा फार प्रयत्न केला आहे. "काळाचेही काळ । आम्ही विठोचे लडिवाळ ।" म्हणून गरजणाऱ्या भक्तशिरोमणीचा एकच अभंग येथें देतोः—

१.

क्षणा क्षणा हाचि करावा विचार । तरावया पार भवसिंधु ॥ १ ॥
नाशिवंत देह जाणा रे सकळ । आयुष्य खातो काळ सावधान॥ धु०॥
संतसमागमीं धरूनि आवडी । करावी तांतडी परमार्थी ॥ २ ॥
तुका ह्मणे इहलोकींच्या वेव्हारें । नये डोळे धुरें भरोनि राहों ॥३॥

(७८) भक्ताला कोणतीं बिरुदें घेतलीं पाहिजेत, हें नारदांनीं ह्या सूत्रांत सांगितलें आहे. अहिंसा, सत्य, शौच, दया, आस्तिक्य इत्यादि चारित्र्यें भक्तांनीं अवश्य पाळलीं पाहिजेत, असें हें सूत्र म्हणतें. अर्थात् हीं सिद्धांची स्वाभाविक लक्षणें असून साधकांनीं त्यांचा जपून अभ्यास करावयाचा आहे. ह्या गुणांचा सिद्धांच्या अंगीं सहज आविर्भाव झालेला असतो व साधकांना हे गुण कित्यासारखे पुढें ठेवून गिरवावयाचे असतात. साधूंचे कित्येक गुण एकमेकांशीं मिळते नसतात, साधु कांहीं एकासारखे एक नसतात. साधूंचें अंतरंग पहावयाचें असतें, त्यांच्या बहिरंगाकडे पाहण्याचें आपणांस कारण नाहीं, असें लोक पुष्कळदां ह्मणतात, आणि हें कांहीं अंशीं खरेंही आहे. तथापि कांहीं गुण असे आहेत कीं, ते साधूंच्या अंगीं अवश्य असतातच, किंबहुना ते नसतील तर साधूंच्या मंडळांतून त्यास बाहेर काढण्यास कांहीं हरकत नाहीं. अहिंसा, सत्य, शौच, दया व आस्तिक्य हें गुणपंचक ज्याच्या अंगीं नाहीं तो साधूच नव्हे, व हें अंगीं आणण्याचा जो कळकळीनें प्रयत्न करीत नाहीं तो साधकच नव्हे, असेंही ह्मणण्यास कांहीं प्रत्यवाय दिसत नाहीं. हे पांच गुण प्रधान असून ते भक्ताच्या अंगीं असलेच पाहिजेत. हरिप्रेम हा भक्ताचा स्वधर्म आहे व हे पांच गुण ही भक्ताची नीति आहे. भक्ताच्या ठिकाणीं धर्म व नीति दोन्ही परिपूर्ण असतात. पक्ष्याचे जसे दोन पंख, नदीचीं जशीं दोन तीरें, मनुष्याचे जसे दोन हात, त्याप्रमाणें भक्ताला धर्म व नीति दोन्हीही

पाहिजेत. नीतीचा ढिला मनुष्य धर्मवंत असूं शकत नाहीं. नीति हा धर्माचा पाया आहे. परमार्थप्रासादाचा नीति हा पाया असून धर्म हा कळस आहे. धर्म जीवपरमात्म्याचें ऐक्य करतो व नीति मनुष्यामनुष्यांचे संबंध चोख राखते. आपले आपल्याशीं, धर्मपत्नीशीं, पुत्रांशीं, आप्तेष्टांशीं व शेजाऱ्यापाजाऱ्यांशीं जे संबंध येतात त्या सर्व संबंधांत यथाशास्त्र यथान्याय वर्तन करणें ही नीति; व अशा प्रकारें वर्तन करून शुद्धचित्त होऊन हरि जोडणें हा धर्म. धर्म नीतीहून श्रेष्ठ आहे, म्हणून क्वचित् प्रसंगीं धर्माकरितां गौण नीतिबंध ढिले केलेले चालतात. 'हरी जोडे ते करावे अधर्म' असें तुकोबांनीं म्हटलें आहे. देवाच्या प्राप्तीसाठीं अधर्म घडलें, नीतिबंध ढिलें झाले तरी चालतात; पण हा नित्यनियम नाहीं, हे अपवाद आहेत. 'नारायणीं जेणें घडे अंतराय' ह्या अभंगांत तुकोबांनीं सांगितलें आहे कीं, हरिप्राप्तीमध्यें आईबाप जर विघ्न करतील तर त्यांचासुद्धां त्याग करावा. प्रल्हादानें जनकाचा, बिभीषणानें बंधूचा, भरतानें राज्याचा व मातेचा त्याग केला, पण हा त्याग नारायणासाठीं असल्यामुळें पापावह नाहीं. गोपी तर पातिव्रत्यधर्म विसरून हरिरंगीं रंगल्या. पण 'सर्व धर्म हरीचे पाय' अशी निष्ठा या सर्वांची असल्यामुळें व त्यांनीं हरिप्रीत्यर्थ बाप, बंधु, माता व पति यांचा त्याग केला असल्यामुळें हे त्रिभुवनाला वंद्य झाले. वस्तुतः पुत्रधर्म, बंधुधर्म, पतिधर्म हे नीतीचे अवश्य भाग असल्यामुळें अवश्य आचरणीय आहेत, तथापि श्रुति व स्मृति यांच्यांत विरोध असल्यास श्रुतीचा स्वीकार करावा असा जसा न्याय आहे त्याप्रमाणेंच धर्म व नीति यांचा विरोध आल्यास धर्माचाच अंगीकार करावा, असें भक्तसंमत तत्त्व आहे. पण विरोधाचा प्रकार जेथें नसेल तेथें धर्म व नीति, यांचें साहचर्यच अवश्य आहे. भरतानें आईचा अधिक्षेप केला तसा प्रत्येक पुत्रानें करावा अशी नीति नाहीं, पण भरताच्या अधिक्षेपांत निर्लोभ रामप्रीति उज्ज्वल असल्यामुळें त्याचा तो अधिक्षेपही जगाच्या कौतुकाला कारण झाला आहे. 'तेजीयसां न दोषाय' हा कायदाही विचारणीय आहे. थोरांचा उपदेशच सामान्य जनांना सेव्य आहे. त्यांचा पराक्रम ज्यांच्यांत नाहीं त्यांनीं त्यांच्या वैगुण्याचें उदाहरण पुढें करण्यांत अर्थ नाहीं. नाथांनीं वृद्ध आजाआजींना बालवयांत

सोडून दिलें व समर्थ मातेला दुःखांत टाकून तपाला निघून गेले, तथापि त्यांनीं या दोषाची अनंतपटीनें भरपाई केली. त्यांनीं श्रीहरीचे पाय जोडले आणि आपला व जगाचा उद्धार केला. असा पराक्रम अंगांत नसतां आई-बापांचा त्याग करणें ही नीति नाहीं–तुकोबांनीं बायकापोरांचा प्रपंच नीट केला नाहीं, व पतिधर्म जागविला नाहीं असा त्यांचेवर कित्येकांचा आक्षेप आहे, यालाही हेंच उत्तर आहे. त्यांनीं प्रपंचाकडे दुर्लक्ष केलें असलें तरी भंडारा डोंगरावर अखंड हरीचें चिंतन करून विश्वाच्या प्रपंचाचें सोनें केलें व धर्मरहस्य जाणून जगाला शिकविलें, या त्यांच्या महत्कृतीपुढें वरील दोप 'पर्वतापुढें मोहरी' या न्यायानें नाहींसाच होतो. बायकापोरांचा प्रपंच थाटानें करण्याचें श्रेय मिळविणारे पुष्कळ आहेत ! 'सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः' हा न्याय असल्यामुळें अगदीं निर्दोप असें कोणतेंच कर्म नाहीं; ह्मणून अल्पहानि सोसून महल्लाभ जोडण्यांत खरा पराक्रम आहे. थोरांच्या चरित्रांत हेंच तत्त्व सांपडतें; आणि महल्लाभ श्रीहरिपद-प्राप्ति हाच असल्यामुळें त्यासाठीं प्रपंचाच्या अल्पहानीची भक्त पर्वा करीत नाहीत. सर्व गुणागुण, सर्व पापपुण्य, सर्व विधिनिपेध श्रीहरीच्या पायीं दग्ध होत असल्यामुळें श्रीहरीचे पाय जोडण्यांत सर्व पुरुपार्थप्राप्तीचें फळ प्राप्त होतें. असो. ह्याप्रमाणें धर्मनीतीसंबंधाचें सार आहे. तथापि साधकानें नीति-धर्म चोख पाळणें व शुद्धाचरण ठेवणें हें अत्यवश्य आहे. वर सांगितलेले अहिंसासत्यशौचादि गुणांचीं लक्षणें काय आहेत ती आतां क्रमानें पाहूं:--

(१) **अहिंसाः**–कायेनें, वाचेनें व मनानें कोणाही जीवाची हिंसा न करणें. कायेनें कोणाला ताडनादि करूं नये, वाचेनें कोणाला दुःख होईल असें बोलूं नये व मनानें कोणाचा घातपात इच्छूं नये, हें अहिंसेचें सामान्य तत्त्व आहे. हें निपेधार्थी लक्षण झालें. पण आतां विधायक लक्षण ऐका. "आणि जगाचिया सुखोद्देशें । शरीरवाचामानसें । रहाटणें तें अहिंसे । रूप जाणा ॥११४॥" (ज्ञानेश्वरी अध्याय १६) जगाच्या सुखोद्देशानें म्हणजे जग सुखी असावें अशा उद्देशानें कायावाचामनानें वागणें हें अहिंसेचें रूप आहे. 'दुःख नेदूनि सुख देणें । या नांव अहिंसा ह्मणणें ।' असें नाथांनींही अहिं-

सेचे लक्षण केलें आहे. 'कोणाही जीवाचा न घडो मत्सर' ही अहिंसा-बुद्धिच. चालावें कसें, बोलावें कसें, पहावें कसें, इत्यादि अहिंसेच्या प्रकारांचें वर्णन ज्ञानेश्वरींत १३ व्या अध्यायांतील ७ व्या श्लोकांतील 'अहिंसा' या पदावरील व्याख्यानांत समग्र पहावें.

(२) **सत्यः**-ऐकल्याबरोबर कानाला गोड लागावें आणि संदेह फेडावा असें जें अविकार बोलणें तें सत्य, अशी ज्ञानोबारायांनीं सत्याची मनोहर व्याख्या केली आहे! 'तेज परी शीतळ शशांकाचें' असा एक दृष्टांतही त्यांनीं दिला आहे. प्रकाश देते आणि अंगाला शीतळही लागते असा चंद्रिकेचा धर्म आहे, तसाच भक्ताच्या सत्य भाषणाचा असतो. सत्य बोलावयाचें म्हणजे कठोरच बोललें पाहिजे अशी कित्येकांची भ्रामक समजूत असते. दुसऱ्याला तोडून टाकून बोलेल तो सत्यवक्ता असें नव्हे. बोलणें 'अविकार' पाहिजे. द्वेष, मत्सर, निंदा इत्यादिकांचा उग्रवास वाचेला येऊं नये. बोलणें खरें असावें. हितकर असावें, मृदु असावें अविकार असावें याचेंच नांव सत्य. "किंबहुना प्रियपणें। कोणातेंही झकऊं नेणें। यथार्थ तरी खुपणें। नाहीं कवणा॥" (ज्ञानेश्वरी १६-१२०) मन आणि वाचा या दोहींला हा असत्याचा मल न लागणें याचेंच नांव सत्य, असें नाथराय सत्याचें लक्षण सांगतात. 'निंदा आणि नरस्तवन। कदा मिथ्या न बोले वचन। वाचा अनसुट धरणें जाण। संपूर्ण सत्य या नांव॥' (एकनाथी भागवत १७-२३९). कोणाही मनुष्याविषयीं बरें बोलावयाचें असो वा वाईट बोलावयाचें असो त्या दोन्ही प्रसंगीं मिथ्या ह्म० अतिशयोक्तीनें न बोलणें व वाचा लगामीं ठेवणें हें संपूर्ण सत्य होय, असें नाथरायांनीं वरील ओवींत खुबीनें सांगितलें आहे. सत्याचें गौरव पुष्कळांनींच केलें आहे. बहुत उतारे देतां ग्रंथविस्तार फार होईल. "सत्यापरता नाहीं धर्म। सत्य तेंचि परब्रह्म। सत्यापाशीं पुरुषोत्तम। सर्वकाळ तिष्ठत॥"—मुक्तेश्वर. 'नरो वा कुंजरो वा' म्हणून देवासाठीं धर्मराज एकवार खोटें बोलले तर त्यांचा आंगठा गळाला, ही गोष्ट प्रसिद्ध आहे.

(३) **शौच** म्ह० शुचिता, निर्मळपणा. आंत निर्मळ आणि बाहेर निर्मळ. आंत विचारानें म्ह० ब्रह्मचिंतनानें वा हरिध्यानानें शुचिर्भूत व बाहेर

निष्काम स्वधर्मकर्मानुष्ठानानें शुचिर्भूत असा जो पुरुष त्याचे ठिकाणीं शौच हा गुण आहे असें समजावें. शुद्ध कनकाच्या भांड्यांत गंगोदक ठेवल्याप्रमाणें अंतर्बाह्य शुचिर्भूतत्व असावें. "आतां निर्वाळूनि कनकें। भरिला गांगपीयूखें। तया कलशाचिया सारिखें। शौच असे ॥ १९७ ॥ जे आंगीं निष्काम आचार। जीवीं विवेक साचार। तो सबाह्य घडला आकार। शुचित्वाचाचि ॥ १९८ ॥" (ज्ञानेश्वरी अ० १६). रत्नाप्रमाणें आंतबाहेर चोखाळ असणें याचें नांव शौच. 'बाहेरीं कर्में क्षाळला। भीतरीं ज्ञानें उजळला।' असें ज्ञानोबारायांनीं अन्यत्र म्हटलें आहे.

(४) **दया**:—दुसऱ्याचें दुःख पाहून मन कळवळणें व लहान थोर किंवा अधमोत्तम हा विचार मनांत न आणतां तें दूर करण्यास झटणें ही दया होय. 'भूतांची दया हें भांडवल संतां। आपुलिया ममता नाहीं देहीं॥' ही तुकोबारायांची उक्ति प्रसिद्धच आहे. संत हे भूतदयेचे सागर असतात. जीव भवार्णवांत बुडतात हें पाहून त्यांचें चित्त द्रवतें व 'येतो हिताचा कळवळा। पडती हातीं म्हणोनि काळा!' ज्ञानोबाराय म्हणतातः—'आतां दया ते ऐसी। पूर्णचंद्रिका जैसी। निवविता न कडसी। सानेथोर॥१५४॥ तैसें दुःखिताचें शिणणें। हरितां सकणवपणें। उत्तमाधम नेणे विवचू गा ॥१५५॥' (ज्ञाने० १६). पाय शीतळ तर डोळे शीतळ, पायाची आग झाली तर डोळ्यांची आग होते, त्याप्रमाणें दयाळु पुरुष दुसऱ्यांचें सुख पाहून सुखावतो व दुसऱ्याच्या दुःखानें दुःखी होतो. 'नवल कृपाळुत्वाचें चित्त। जिवाचा जीव जीवीं सूत। दुःख हिरोनि सुख देत। कृपा अद्भुत तयापरी ॥ ८३३ ॥' (एकनाथी भागवत अ० ११) दुसऱ्या जीवांचे जीव आपल्या जीवांत घालून त्यांशीं एकजीव होऊन जाणें, हें दयेचें लक्षण होय. दामाजीपंत, एकनाथ महाराज, अहल्याबाई होळकरीण, हीं नांवें उच्चारतांच दया म्हणजे काय तें कळणार आहे.

(५) **आस्तिक्य**:—ईश्वरावर व शास्त्रावर पूर्ण निष्ठा याचें नांव आस्तिक्य. अस्ति म्ह० आहे असा भाव, याचें नांव आस्तिक्य. देव आहे, देव दयाळु व परमसमर्थ आहे, तो भक्ताचें सांकडें निवारतो व माझ्या आंतबाहेर

तोच खेळत असून माझ्या कल्याणास्तव तो मला योग्य मार्ग दाखवून माझें आत्यंतिक हित करितो, असा अचल भाव असणें हें आस्तिक्य होय. याला बाह्य प्रमाणाची गरज नसते. शास्त्रप्रमाणाची व प्रतिपादनाची याला जरूरी नसते. वत्स जसें मातेकडे स्वभावतः धांवतें त्याप्रमाणें स्वयं-सिद्ध प्रेमानें चित्तवृत्ति देवाकडे धांवणें याचेंच नांव आस्तिक्य. 'देवा-विण कांहीं नाहीं। ऐसें बोलती सर्वही। परंतु त्यांची निष्ठा कांहीं। तैसीच नसे ॥' असें समर्थांनीं जगाची राहटी पाहून म्हटलें आहे. सर्वच आपण आस्तिक आहोंत असें म्हणतों व देखोवेखीनें दाखवितों; पण प्रल्हादाची आस्तिक्यबुद्धि ही खरी होय. जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं नारायण भरला आहे व तोच माझ्यांत असून मला हलवतो, बोलवतो, असा त्याचा अचल भाव असल्यामुळें त्याला दिलेलें विषही अमृत झालें, अग्नि शीतळ झाला व पाणीही त्याला बुडवूं शकलें नाहीं. तुकोबांच्या वह्या पाण्यांत राखून देवानें आपलें अस्तित्व आणखी एकवार जगाच्या निदर्शनास आणलें.

असो. नारदांच्या सूत्रांतील अहिंसा, सत्य, शौच, दया आस्तिक्य या पांच पदांचें येथवर विवरण केलें. 'आदि' पदावरून हे पांच गुण मुख्य असून बाकीच्या अनेक गुणांचीही अपेक्षा सूचित केलेली आहे. 'अहिंसासत्यशौचदयास्तिक्यादि चारित्र्याणि परिपालनीयानि' ह्याप्रमाणें नारदांनीं भक्ताला सहज व साधकाला अवश्य आचरणीय अशा नीति-धर्मांचें वर्णन करून सांगितलें आहे. हे नीतिधर्म सर्व वर्णांना आदरणीय आहेत. श्रीव्यासांनीं भागवतांतही ( अ० १७ ) म्हटलें आहेः-

अहिंसासत्यमस्तेयमकामक्रोधलोभता।
भूतप्रियहितेहा च धर्मोऽयं सार्ववर्णिकः ॥ २१ ॥

यांतील अहिंसा, सत्य, भूतप्रियहितेहा म्ह० भूतमात्रांच्या कल्याणाची आवड ऊर्फ दया हीं तीन पदें नारदसूत्राप्रमाणेंच असून अकामक्रोधलो-भता म्ह० काम, क्रोध व लोभ या त्रयीपासून मुक्तता हेंच शौच असा अर्थ घेतला व आस्तिक्य आणखी समजलें म्हणजे वरील सूत्रच तयार होतें! हे पूर्ण भक्तांच्या अंगचे सहजगुण मुमुक्षुसाधकांनीं निरंतर डोळ्यां-

पुढें ठेवून आचरणांत आणण्यास मनोभावें झटावें म्हणजे नारायण कृपा करील. हेंच पुढील सूत्रांत नारद सांगतात.

( ७९।८० ) सर्व प्रकारच्या चिंता सोडून सर्वकाळ सर्वभावानें भगवंताचेंच चिंतन करावें; कारण त्याचे गुण गातां गातां तन्मयता प्राप्त होते व भगवान् साक्षात् प्रकट होऊन भक्तावर पूर्ण अनुग्रह करितात, असें नारदांनीं ह्या दोन सूत्रांत सांगितलें आहे. नारदांचें हें भक्तीचें आख्यान संपत आलें आहे तेव्हां त्यांनीं भगवान् साक्षात् प्रकट होऊन भक्तांवर अनुग्रह करितात, हें स्वानुभवाच्या दिव्यवाणीनें येथें सांगितलें आहे व 'देव मला कधीं भेटेल' अशी तळमळ करणाऱ्या मुमुक्षूसाधकांना आपल्या अमृतवाणीनें आश्वासन दिलें आहे. 'आविर्भवति' ह्या पदानें देव सगुणरूपानें दर्शन देतात असें सुचविलें आहे. देव सगुण आहे व निर्गुण आहे, दोन्हींहि देवाचींच अंगें आहेत हें यद्यपि खरें आहे, तरी भक्तांनीं देवाच्या सगुणरूपाचाच ध्यास असतो; व सगुणदर्शनावांचून भक्तांची भूक शमलेली नाहीं. नारदांनीं स्वतः प्रल्हादध्रुवादिकांना देवाच्या सगुणरूपाचेंच ध्यान देऊन सगुणदर्शन घडविलें आहे, व ते स्वतः सगुणाचेच उपासक आहेत. ध्रुवाला त्यांनीं ' ॐ नमो भगवते वासुदेवाय ' ह्या द्वादशाक्षरी मंत्राचा उपदेश दिला, व 'श्रीवत्सांकं घनश्यामं पुरुषं वनमालिनम् । शंखचक्रगदापद्मैरभिव्यक्तचतुर्भुजम् ॥' ( श्रीभागवत स्कंध ४ अ० ८ पहा. ) अशा भगवान् विष्णूचें ध्यान करावयास शिकविलें, आणि भगवान् साक्षात् प्रकटही झाले. असे अनेक भक्तांचे अनुभव आहेत. भगवंताचें प्रकट होणें दोन प्रकारांनीं होतें. ' परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ' रामकृष्णादि अवतार घेऊन कांहीं मर्यादित कालपर्यंत भूलोकावर राहतात. हे बहुजनकल्याणार्थ अवतार झालेले असतात. त्याचप्रमाणें ध्रुव, प्रल्हाद, नामदेव, रामदास, एकनाथ, नरसो मेहता, कृष्णचैतन्य, तुकाराम इत्यादि भक्तांना व्यक्तिशः देवाच्या सगुणरूपाचें दर्शन झालेलें आहे. एकच उदाहरण घेतों. तुकाराममहाराजांच्या वह्या रामेश्वरभट्टांनीं इंद्रायणीच्या डोहांत बुडविल्या, तेव्हां भगवंतांनीं बालवेषानें—श्रीकृष्णरूपानें त्यांस प्रत्यक्ष दर्शन दिलें, याबद्दल तुकोबारायांची स्वतःची साक्ष आहे. (याबद्दल विशेष स्पष्ट विवेचन माझ्या 'श्रीतुकाराममहाराजाच्या चरित्रांत' येणार आहे.)

## १४ भक्तीचे अकरा प्रकार.



**गुणमाहात्म्यासक्ति, रूपासक्ति, पूजासक्ति, स्मरणासक्ति, दासासक्ति, सख्यासक्ति, कांतासक्ति, वात्सल्यासक्ति, आत्मनिवेदनासक्ति, तन्मयतासक्ति, परमविरहासक्तिरूपा एकधाप्येकादशधा भवति ॥ ८२ ॥**

**स्पष्टीकरण.**

ही भक्ति एकरूप असून अकरा प्रकारची होते. एकच पाणी वेगवेगळ्या कुंडांतून वाहिलें म्हणजे कुंडाच्या आकृतिविशेषावरून भिन्न भिन्न नांवें मिळालीं तरी जीवन एकच असतें, त्याप्रमाणें भक्तीचे प्रकार अकरा सांगितले आहेत तरी सर्वांतून प्रेमाचेंच जीवन एकच वाहतें. एका इमारतीचे आठ दिशांनीं फोटो घेतले कीं आठ चित्रें वरवर पहाणारास वेगवेगळीं दिसतात, तरी सर्व मिळून इमारत एकच. तसाच बहुविध भक्तीचा प्रकार आहे. श्रीरामचंद्राकडे दशरथ पुत्रभावानें पहात, वशिष्ट परमात्मभावानें पाहत, भरतलक्ष्मण बंधुभावानें पाहत, सीता पतिभावानें पाही, मारुतिराय स्वामिभावानें पाहत, प्रजा राजा या दृष्टीनें पाही; पण सर्वांच्या हृदयांतलें रामाचें प्रेम एकच होतें. हाच प्रकार भक्तीचा आहे. कोणी भगवंताचे दयासामर्थ्यादि गुण पाहून भुलतो; कोणी भगवंताचें 'मुरलीधर बन्सीवाला' असलें रूप पाहून भुलतो; कोणी 'पुजून देव पाहिजे' ह्याप्रमाणें पूजा करून देवाची मूर्ति पाहून तन्मय होतो; कोणी अखंड चिंतन व नामस्मरण यांतच रंगून जातो, कोणी सेवकभाव संभाळून सेवा किंवा अर्चनवंदनादि करण्यांतच धन्यता मानतो; कोणी सख्यभक्ति करितो; कोणी गोपींसारखी कांताभक्ति करितो; कोणी यशोदेसारखी वात्सल्यभक्ति करितो; कोणी आत्मनिवेदन करून किंवा विरहदुःखी होऊन कृतार्थ होतो; जो तो आपापल्या प्रकृतिधर्माप्रमाणें किंवा आवडीप्रमाणें भक्ति करितो पण हे सर्व भगवंताचे भक्तच असून यांपैकीं अमुक प्रकार उच्च किंवा अमुक

नीच, असा कांहींएक भेदभाव नाहीं. 'उदाराः सर्व एवैते' हें लक्षांत ठेवावें. आपला एक प्रकार निवडावा, बाकीच्या प्रकारांतील सुखही यथाकाल भोगावें. 'एक अंतरीं निश्चळ। जें निहाळितां केवळ। विसरले सकळ। संसारजात ॥ १७२ ॥ एकां गुणानुवाद करितां। उपरती होउनि चित्ता। निरवधि तल्लीनता। निरंतर ॥ १७३ ॥ एक ऐकतांचि निवाले। ते देहभावीं सांडिले। एक अनुभवें पातलें। तद्रूपता ॥ १७४ ॥" असें ज्ञानोबारायांनीं 'आश्चर्यवत्' (गीता २–२९) ह्या श्लोकाच्या टीकेंत म्हटलें आहे. कोणी 'पश्यति,' कोणी 'वदति,' कोणी 'शृणोति' पण सर्व आश्चर्यानें–आनंदोल्हासानेंच देवाचा विचार करतात. रुचिवैचित्र्यामुळें पंथ भिन्न असले तरी 'नृणामेको गम्यस्त्वमसि पयसामर्णव इव' असें महिम्नस्तोत्रांत म्हटलें आहे. 'पयसामर्णव इव' ह्याच महिम्नांतील दृष्टांत ज्ञानोबारायांच्या वाणीनें सांगायचा म्हणजे "जैसे सरिताओघ समस्त। समुद्रामाजीं मिळत। परी माघौते न समात। परतले नाहीं ॥ १७५ ॥" असें म्हटलें पाहिजे. असो, नारदांनीं वरील सूत्रांत भक्तीचे अकरा प्रकार सांगितले आहेत ते भागवतग्रंथांत सांगितलेल्या नवविधा भक्तीसारखेच आहेत. हिरण्यकश्यपूनें प्रल्हादास विचारलें कीं 'बाळा! तूं गुरूपासून काय शिकलास?' तेव्हां भक्तशिरोमणि प्रल्हाद म्हणालेः—

श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम्।
अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ २३ ॥
इति पुंसाऽर्पिता विष्णौ भक्तिश्चेन्नवलक्षणा।
क्रियते भगवत्यद्धा तन्मन्येऽधीतमुत्तमम् ॥ २४ ॥

—श्रीभागवत स्कंध ७ अ० ५.

म्हणजे प्रल्हाद म्हणाला, "विष्णूचें श्रवण, कीर्तन, स्मरण, चरणसेवन, पूजन, वंदन, दास्य, सख्य व निवेदन अशी भगवंताची नवविधा भक्ति निष्काम प्रेमानें जेणेंकरून घडेल तें अध्ययन (शिक्षण) उत्तम होय, असें मी समजतों." ह्या नवविधा भक्तीचें सरळ व सरस विवरण समर्थांच्या दासबोधांत चवथ्या

दशकांत केलें आहे, तें जरूर पहावें. नवविधाभक्तीनें किंबहुना कोणत्याही एका भक्तीनें अनेक जीव तरलेले आहेत. परीक्षितिराजा श्रवणभक्तीनें तरला, शुकाचार्य कीर्तनभक्तीनें तरले, प्रल्हाद स्मरणानें, लक्ष्मी पादसेवनानें, पृथुराजा पूजनानें, अक्रूर वंदनानें, मारुतिराय दास्यानें, अर्जुन सख्यानें, बलि आत्मनिवेदनभक्तीनें- याप्रमाणें कोणत्याही एका भक्तीच्या उत्कर्षानेंही असे अनंत जीव तरले आहेत.

अभिमन्युसुतो मुक्तिं गतः श्रवणतो हरेः ।
शुकस्तु कीर्तनादेव प्रल्हादः स्मरणेन च ॥ १ ॥
पादसेवनतो लक्ष्मीः पृथुः पूजनमात्रतः ।
अभिवंदनतोऽक्रूरो दास्येनांजनिकासुतः ।
सख्यत्वेनार्जुनो राजा बलिस्त्वात्मनिवेदनात् ॥ २ ॥

भगवंतावर अचल प्रेम ठेवल्यानें भक्त उद्धरून जातोच, पण कामद्वेषमत्सरादि कोणत्याही वृत्तीचा ओघ भगवंताकडे वळविल्यानेंही अनेक दुष्ट व पामर उद्धरून गेले आहेत! "कामाद्द्वेषाद्भयात्स्नेहाद्यथा भक्त्येश्वरे मनः । आवेश्य तदघं हित्वा बहवस्तद्गतिं गताः ॥ २९ ॥ गोप्यः कामाद्भयात्कंसो द्वेषाच्चैद्यादयो नृपाः । संबन्धाद्वृष्णयः स्नेहाद्यूयं भक्त्या वयं प्रभो" ॥ ३ ॥-श्रीभागवत स्कंद ७ अ० १.

**अर्थः**—"जसें भक्तीनें तसेंच, काम, द्वेष, भय, स्नेह, या विकारांमुळेंही देवाच्या ठिकाणीं मन लावल्यानें निष्पाप होऊन अनेक पुरुष तरले आहेत. कामामुळें—अर्थात् कांतासक्तिभक्तीनें—गोपी तरल्या, कंस भीतीनें, चैद्यादि राजे द्वेषानें, यादव संबंधामुळें, तुम्ही स्नेहानें व आम्ही (नारद परीक्षितीस सांगतात) भक्तीनें तरलों आहोंत." ह्या श्लोकांचा बरोबर असाच भावार्थ ज्ञानोबारायांनीं ज्ञानेश्वरींत उतरून दिलेला आहे. "हेंचि कवणें एके मिसें । चित्त माझे ठायीं प्रवेशे । येतुलें हो मग आपैसें । मीचि होणें असे ॥ ४६३ ॥ अगा वरी फोडावयाचिलागीं । लोहो मिळो कां परिसाचे अंगीं । कां जे मिळतिये प्रसंगीं । सोनेंचि होईल ॥ ४६४ ॥ पाहे पां वल्लभाचेनि व्याजें । तिया व्रजांगनाचि निजे । मज मिनलिया काय माझें । स्वरूप नव्हती! ॥ ४६५ ॥ ना तरी भयाचेनि मिसें । मातें न पविजेचि काय कंसें । कीं अखंड वैरवशें । चैद्यादिकीं? ॥४६६॥ अगा सोयरेपणेंचि

पांडवा। माझें सायुज्य यादवा कीं ममत्वें वसुदेवां- दिकां सकळां ॥ ४६७॥ नारदा ध्रुवा अक्रूरा । शुका हन सनत्कुमारा ।.इयां भक्ती मी धनुर्धरा । प्राप्य जैसा ॥ ४६८ ॥ तैसाचि गोपिकांसि कामें । तया कंसा भयसंभ्रमें । येरां घातकां मनोधर्में । शिशुपाळादिकां ॥ ४६९ ॥" (ज्ञानेश्वरी, अ० ९)

ह्या ओव्या ज्ञानेश्वरमहाराज मुखानें बोलत असतां वरील भागवतांतील श्लोकच त्यांच्या डोळ्यांपुढें स्पष्ट होते असें कोणीही कबूल करील ! वरील दृष्टांताचा भावार्थ जसा श्रीव्यासांनीं 'तस्मात्केनाप्युपायेन मनः कृष्णे निवेशयेत्' ( ७-१-३१ ) याप्रमाणें काढला आहे तसाच ज्ञानोबारायांनींही काढला आहे:—

"अगा मी एकलाणीचें खागे । मज येवां ये भलतेनि मार्गें । भक्ति कां विषयविरागें । अथवा वैरें ॥ ४७० ॥ म्हणोनि पार्था पाहीं । प्रवेशावया माझिया ठायीं । उपायांची नाहीं । वाणी येथ ॥ ४७१ ॥ आणि भलतिया जाति जन्मावें । मग भजिजे कां विरोधावें । परि भक्ता कां वैरिया व्हावें । माझियाचि ॥ ४७२ ॥ यालागीं पापयोनीही अर्जुना । कां वैश्य शूद्र अंगना । मातें भजतां सदना । माझिया येती ॥ ४७४ ॥"

---

१ टीपः-ह्या अवतरणांवरून एका मुद्याच्या गोष्टीकडे वाचकांचें लक्ष वेधावेंसें वाटतें. वर दिलेले भागवतांतील श्लोक व ज्ञानोबारायांच्या ओंव्या पाहतांना निर्विवाद लक्षांत येतें कीं, ज्ञानोबारायांच्या डोळ्यांपुढें भागवतांतील वरील श्लोक खात्रीनें होते किंबहुना वरील ओंव्या त्या श्लोकांचें शब्दशः भाषांतरच आहे असें म्हटलें तरी चालेल. भागवतग्रंथ चौदाव्या शतकांतला असून ज्ञानेश्वरींत त्याचा संबंध कोठेंही दिसत नाहीं असें एका विद्वानानें (प्रो. भानु) नुकतेंच प्रतिपादिलें होतें, त्याचें उत्कृष्ठ खंडण ह्या गोष्टीनें होतें. ज्ञानेश्वरीपूर्वींचा भागवतग्रंथ आहे एवढी गोष्ट तरी यावरून अर्वाचीन विद्वानांस कबूल करावी लागेल ! शिवाय ज्ञानेश्वरींत भागवताचा स्पष्ट उल्लेखच आहे. 'ते हे कल्पादि भक्ति मियां । श्रीभागवतमिषें ब्रह्मया । उत्तम म्हणोनि धनंजया । उपदेशिली ॥' ( अ० १८-११३२ ) कल्पारंभीं भगवंतांनीं ब्रह्मदेवाला भक्ति सांगितल्याची कथा भागवत, स्कंद २ अध्याय ९ मध्यें सविस्तर पहावी. चतुःश्लोकी भागवत तेव्हांच निर्माण झालें.

*

# १५ उपसंहार.

**इत्येवं वदंति जनजल्पनिर्भयाः एकमताः कुमारव्यासशुकशांडिल्यगर्गविष्णुकौंडिन्यशेषोद्धवारुणिबलिहनुमद्विभीषणादयो भक्त्याचार्याः ॥ ८३ ॥**

**य इदं नारदप्रोक्तं शिवानुशासनं विश्वसिति श्रद्धत्ते स भक्तिमान् भवति स प्रेष्ठं लभत इति ॥ ८४ ॥**

### स्पष्टीकरण.

(९३) येथवर भक्तीचें जें निरूपण केलें तें, नारद म्हणतात कीं, मीं आपल्या स्वानुभवाप्रमाणें बरोबरच केलें आहे, पण याला दुसऱ्या श्रेष्ठ भक्तांचाही दुजोरा आहे. भक्तीचें महत्व याप्रमाणेंच आणखीही भक्तांनीं सांगितलें आहे. थोर पुरुष आपलें महत्व वाढविण्याकरितां पूर्वी होऊन गेलेल्या, किंवा वर्तमानकाळीं असणाऱ्या अन्य श्रेष्ठांचा नामोच्चार करण्यास लाजत नाहींत. दुसऱ्यानें महत्प्रयासानें मिळविलेली माहिती किंवा सिद्धांत आपले म्हणून दडपून देतांना त्यांच्या नांवाचा उच्चारही गौरवपूर्वक करितांना ज्यांची वाणी कचरते असे चोर सामान्य ग्रंथकारांत पुष्कळ आढळतात; पण हा श्रेष्ठाचार नव्हे. श्रेष्ठाचार असा आहे कीं, प्राचीनांचें गौरव करून अर्वाचीनानें त्या परंपरेंत विनयानें मिसळून जावें. 'अथवा कृतवाग्द्वारे वंशेऽस्मिन् पूर्वसूरिभिः । मणौ वज्रसमुत्कीर्णे सूत्रस्येवास्ति मे गतिः' असें कालिदासानें रघुवंशाच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे. आपलें ज्ञान परंपराप्राप्त आहे असें म्हणण्यांत थोरांना भूषणच वाटतें. तुकोबारायांनीं आपल्या अवताराचें प्रयोजन सांगतांना 'बोलिले जें ऋषी (तें) साच भावें वर्ताया' आम्ही आलों आहोंत असें म्हटलें आहे. 'झाडूं संतांचे मारग' एवढेंच कर्तृत्व ते आपल्याकडे घेतात. असो. नारदांनींही येथें कुमार म्ह० सनत्कुमार (नारदांचे बंधु), व्यास, शुकाचार्य, शांडिल्य (यांचीं सूत्रें शांडिल्यसूत्रें या नांवानें प्रसिद्धच आहेत), गर्ग (यांनीं गर्गसंहितेंत भक्तिशास्त्रावर लिहिलें आहे), विष्णु (हे स्मृतिकार असावेत), कौण्डिण्य, शेष, उद्धव (यांला भागवतस्कंध ११ मध्यें श्रीकृष्णांनीं भक्तिज्ञानाचा बोध केला आहे), अरुणि, बलि, हनुमान्,

बिभीषण इत्यादिकांनीं भक्तीचें याप्रमाणेंच स्वरूप ओळखून प्रसंगोपात् भक्तीचें वर्णन केलें आहे. हे मोठे थोर भक्त होऊन गेले. यांनीं एकमतानें भक्तीचें असें गौरव केलें असून यांना नारदांनीं 'भक्त्याचार्य' असें योग्य विशेषण दिलें आहे. भक्तिमार्ग यांनींच जगांत रूढविला. यांनीं लक्षावधि जीवांना भगवत्प्राप्तीचा उपाय भक्तिमार्ग हाच दाखविला आहे.

( ९४ ) हें नारदांनीं सांगितलेलें 'शिवानुशासन' आहे, म्हणजे हा 'कल्याणाचा उपदेश' आहे किंवा 'शंकरांनीं केलेला हा उपदेश' आहे. शंकर हे भागवतधर्मीय वैष्णवांचे आद्य गुरु आहेत. आद्य भक्त, आद्य वैष्णव ते, म्हणूनच आद्य गुरूही तेच. श्रीज्ञानेश्वरमहाराज हे महाराष्ट्रांतले आद्य भक्तिपंथप्रवर्तक होत. त्यांनीं ज्ञानेश्वरीच्या अखेरीस जी आपली गुरुपरंपरा दिली आहे तींत 'आदिगुरु शंकरा–। लागोनि शिष्यपरंपरा। बोधाचा हा संसरा। आला जो आमुतें ॥' असें स्पष्ट म्हटलें आहे. त्यांनीं बाराव्या अध्यायांत 'तरी श्रद्धावस्तूसी आदरू। करितां जाणिजे प्रकारू। जरी होय श्रीगुरु। सदाशिव ॥ २१६ ॥" असें सांगितलें आहे. आणि पांडुरंगांनींही जगाला भक्तिरहस्य शिकविणाऱ्या आपल्या परमप्रिय भक्ताला मस्तकावर घेतलें आहे हें पढरीस जाणाऱ्यांला कांहीं सांगावयाला नको आहे. 'विठोनें शिरीं वाहिला देवराणा' असें समर्थांचें वचन प्रसिद्धच आहे. असो, तुम्हां-आम्हांला हरिहर एकरूपच आहेत आणि तत्वतःसुद्धां परस्परांच्या प्रेमचिंतनानें ते एकरूपच आहेत. तर अशा ह्या शिवांनीं प्रकट केलेल्या आणि नारदांनीं ग्रथित केलेल्या भक्तिशास्त्रावर पूर्ण विश्वास व श्रद्धा ठेवून जो वागतो त्याच्या ठिकाणीं नसलें तरी भक्तिप्रेम उत्पन्न होऊन तो वांछित लाभेल व कृतार्थ होईल अशी ही ग्रंथाची फलश्रुति आहे. तात्पर्यः—

हित तें करावें देवाचें चिंतन। करूनियां मन शुद्ध भावें ॥ १ ॥

——श्रीतुकाराम.

बोला. 'पुंडलीक वरदे हरिविठ्ठल ! ॥
श्रीज्ञानेश्वरमहाराज की जय ! ॥
श्रीएकनाथमहाराज की जय ॥
श्रीतुकाराममहाराज की जय ॥
श्रीरामदासमहाराज की जय' ॥